




नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)

महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com


# निवेदन




अनुक्रमणिका








# यंत्रसामुग्रीच्या अधिकाधिक कारखानदारांचीं

## विश्वसनीय

## किर्लोस्कर

## डिझेल एंजिनें



टाइप एव्ही आणि जेव्ही ५ ते १५ हॉर्स पॉवर



टाइप वी २-२० ते २५ हॉर्स पॉवर





टाइप वी ४-४० ते ४८ हॉर्स पॉवर



टाइप आर ए., हवेनें थंड होणारीं १७ हॉर्स पॉवर ते ६५ हॉर्स पॉवर



देशांत तयार होणाऱ्या, पुढील कितीतरी प्रकारच्या यंत्रसामुग्रीच्या बाबतींत हमखास शक्ति पुरवठ्याचें साधन म्हणून किर्लोस्कर एंजिनें विश्वासास पात्र ठरलीं आहेत – काँक्रीट मिक्सर्स, कॉम्प्रेसर्स, टार मिक्सर्स, रोड रोलर्स, पंप, क्रशर्स, जनरेटर्स इत्यादि.

सर्वश्रेष्ठ दर्जा आणि कितीहि खडतर परिस्थितींत कोणत्याहि कटकटींवांचून उत्तम कामगिरी या त्यांच्या गुणांमुळें यंत्रसामुग्रीचे अधिकाधिक कारखानदार ही एंजिनेंच प्रथम पसंत करतात.

**किर्लोस्कर ऑइल एंजिन्स लिमिटेड.**

रजिस्टर्ड ऑफिस : एल्फिन्स्टन रोड, पुणें-३ (भारत)

अनुक्रमणिका

# दीपावली

साहित्य-कला-संगमम

डिसेंबर १९६३, वर्ष १९ वें



## श्रेयनामावलि–

*कथा :*

- **कलावती**–रणजित देसाई • **आवडा**–प्रभाकर नेरूरकर • **मोहोर**–इंदू साकीकर
- **बायकोची बायको**–प्रभाकर झिडवे • **चोरकथा व मोरकथा**–ह. वि. उसेंकर
- **भाजी**–सिनिक्

*एक व्यंग कृति :*

- **चित्रपत्रें**–एका व्यंगचित्रकाराचें स्वप्नरंजित पत्र रेखाटन.

*चालू कादंबरी :*

- **भिष्माचा डोंगर**–श्रीराम कामत लिखित कादंबरीचा पुढील भाग.

*ललित व विनोदीलेख :*

- **नववधू प्रिया मी**–आनंद साधले • **विंध्य वसुंदरा**–यशवंत शास्त्री • **बायका व त्यांच्या संवयी**–विठ्ठल रामजी भाटकर.

*आकर्षक सदरें :*

- **गीतार हास्य**–अजबराव
- **पानीपुरी** • **दीपमाला**–सारस्वत

दलाल आर्ट स्टुडिओ ४२ केनेडी ब्रीज, मुंबई ४

टे. नं. ७७७६५

Gram:– DALALART

*संपादक-मुद्रक-प्रकाशक-मालक-श्री. **दीनानाथ दलाल,** दलाल आर्ट स्टुडिओ, ४०–४२, केनेडी ब्रीज, मुंबई ४. या प्रतीस किंमत १ रु. + रजि. पोस्ट ५५ न. पैसे. वार्षिक वर्गणी दिवाळी अंकासह रु. १२॥. अंकांत प्रसिद्ध झालेलीं मतें हीं चालकांचींही अधिकृत मतें असंतातच असें नाहीं.

अनुक्रमणिका







# दीपावली


**दलाल आर्ट स्टूडिओ**

४२, केनेडी ब्रीज, मुंबई ४.

टेलिफोनः ७७७६५  तारेचा पत्ता : DALALART

● **वर्गणीदारांस सूचना** : दीपावली व सर्व खास अंकांसह दीपावलीची वार्षिक वर्गणी रु.१२–५०न. पै., द्वैवार्षिक वर्गणी रु. २०; त्रैवार्षिक वर्गणी रु. २५ व चार वर्षांची वर्गणी रु. ३२. **परदेशी वार्षिक वर्गणी रु. १६–००**

● **वर्गणी** मनिऑर्डरनें यावी. चेक पाठविल्यास तो दलाल आर्ट स्टूडिओच्या नांवें, मुंबई बँकेवरचा असावा. इतर ठिकाणच्या बँकेवरचा असल्यास ७५ न. पै. वटणावळ जादा पाठवावी. कोणत्याहि महिन्यापासून वर्गणीदार होतां येतें.

● **अंक न पोचल्याचें कळवावयाचें झाल्यास** ५ तारखेपर्यंत वाट पाहून मग कळवावें. अंक ऑफिसमध्यें शिल्लक असल्यास जरूर पाठविला जाईल.

● **जाहिरातींचा व्यवहार** हा परस्पर विश्वासाचा असतो. गिऱ्हाइकांच्या इच्छेनुसार जाहिरात छापण्याची कोशिस करण्यांत येते. तरीहि तांत्रिक अडचणीमुळें अगर अन्य कारणामुळें जाहिरातींत कमीजास्त फरक झाला तर त्याची जबाबदारी व्यवस्थापकांवर नाहीं.

● **साहित्याच्या स्वीकृतीचा निर्णय** महिनाभरांत सामान्यतः कळविला जातो. **पोस्टेज असलेलें** नापसंत साहित्य परत पाठविलें जातें. पुरेसें पोस्टेज नसल्यास तें निकालांत काढलें जाईल.

● **स्वीकृत अगर इतर साहित्य गहाळ** झालें तर त्याची जबाबदारी व्यवस्थापकांवर नाहीं.

संपादक, मालक, मुद्रक व प्रकाशक श्री. दिनानाथ दलाल यांनीं आवाज प्रिंटर्स, मोदी चेंबर्स, फ्रेंच ब्रीज, मुंबई ४ येथें छापून, दलाल आर्ट स्टूडिओ, ४२ केनेडी ब्रीज, मुंबई ४ येथें प्रसिद्ध केलें.


# वैऱ्याचें बोलणें जे विश्वासार्ह मानतात ते खुळे नाश पावतात......

फार जुनी गोष्ट. जेव्हां पशुपक्षी माणसांप्रमाणें बोलत असत. कांपिल्य नांवाच्या नगरामध्यें तेव्हां ब्रह्मदत्त नांवाचा राजा रहात होता. त्याच्या अंतःपुरामध्यें पूजनी नांवाची एक चिमणी रहात असे. या चिमणीचें पिलूं आणि राजाचा कुमार यांचें वय एकच असून ते सवंगडी होते. चिमणी दोघांवर फार फार माया करी आणि उपवनांतील फळें आणून दोघांना सारखीं खावयास देई.

एके दिवशीं खेळतां खेळतां राजकुमाराची लहर फिरली आणि त्यानें चिमणीच्या पिलाला जमिनीवर आपटलें आणि त्याचा नाहक प्राण घेतला. ही गोष्ट घडत असतां योगायोगानें पूजनी फलहार घेऊन तेथें आली. राजकुमाराची कृतघ्नता पाहून तिला संताप आला आणि तिनें तात्काळ राजकुमारावर हल्ला करून त्याचे दोन्ही डोळे आपल्या चोंचीनें फोडून टाकले. इवलीशी चिमणी असून तिनें आपल्यावर घडलेल्या अन्यायाचा विरोचित बदला घेतला.

पुत्राचा आक्रांत ऐकतांत ब्रह्मदत्त तेथें धावून आला. सर्व वर्तमान जाणून तो चिमणीला म्हणाला, 'असो. आतां झालें तें गेलें. मी अहिंसा आणि पंचशील या मार्गानें जाणारा माणूस आहे. तरी तूं यापुढें माझ्याशींच स्नेह धरून रहा. दुसऱ्या धनवानाच्या आश्रयास जाऊं नको. तुझें माझें वैर नाहीं. सर्व फिटंफाट झाली आहे.'

त्यावर पूजनीनें उत्तर दिलें, 'राजा, वैऱ्यावर विश्वास ठेवून त्याच्याशीं वाटाघाटी करणारा मूर्ख माणूस तात्काळ नाश पावतो. जो वैरी असेल त्यावर तर विश्वास ठेऊं नयेच पण जो विश्वासू असेल त्यावरहि अधिक विश्वास ठेऊं नये. कुणावरहि ठेवलेला असावध विश्वास आपल्या व्यक्तित्वाचा आणि यशाचा मूलोच्छेद करतो हें न जाणणारे अजाण होत. आपणा विषयीं वाटल्यास दुसऱ्याच्या मनांत विश्वास उत्पन्न करावा पण आपण कुणावरहि झोंपाळू विश्वास टाकूं नये.'

त्यावर राजा म्हणाला, 'पूजनी, तूं अडाणी आहेस. सत्य हें ईश्वराचें स्वरूप आहे. विश्वास हा ईश्वराचा निश्वास आहे. हें जग विश्वासावर चालतें; इत्यादी महान तत्वज्ञान तुला अज्ञात आहे. तूं आपल्या मनाचा आणि बुद्धीचा कोतेपणा प्रकट करीत आहेस.'

त्यावर पूजनी उत्तरली, 'राजा, ईश्वरानें मला माझ्यापुरती अक्कल दिली आहे. मी हत्तिणीच्या मोहांत गुंतून खड्ड्यांत पडणारा हत्ती नव्हे. मी आमिषास गुंतून गळास लागणारा मासा नव्हे. मी पुंगीला गुंगून वश होणारा नाग नव्हे. मी पूजनी चिमणी आहे. राजा, आत्मयश हेंच ध्येय नसेल तर तत्त्वज्ञानाला मर्यादा हवी. व्यवहारांत यशस्वी व्हायला हवें तर व्यवहार हवा. सृष्टींत ईश्वर वावरतो तसा सैतानही वावरतो. सैतानाला ओळखण्याची व्यावहारिक धूर्तता आणि सावधानता नसेल तर ईश्वर सहाय्यास येणार नाहीं.

'राजा, उशना कवीनें प्रल्हादाला पुढील उपदेश केलेला तुला माहीत आहे काय ?

ये वैरिणः श्रद्दधते सत्ये सत्येतरेऽपि वा
वध्यन्ते श्रद्दधानास्तु ॥ म. भा. शां.१३९।७१

खरें असो वा खोटें असो. **वैऱ्याचें बोलणें जे विश्वासार्ह मानतात ते खुळे नाश पावतात.** ही सृष्टी विश्वासावर चालत असती तर तिचें स्वरूप आहे असें नसतें. माझें पिलूं तुझ्या पुत्रावर विश्वासलें त्याचें त्याला काय फळ मिळालें ? 'जीवो जीवस्य जीवनम्' हाही नियम या सृष्टीचाच आहे. माझ्याशीं तुझें वैर नाहीं असें जें तूं म्हणत आहेस त्यावर तुझाच स्वतःचा विश्वास असेल तर तूं अव्यवहारी मूर्ख मनुष्य आहेस. माझें जीवन मला जगावयाचें आहे. मी तुझ्यावर विश्वास ठेवणार नाहीं. आम्हीं शत्रूवर विश्वास ठेवला हो ! त्यांनीं आमचा गळा कापला हो ! असा विलाप करण्याचा प्रसंग मी माझ्यावर येऊं देणार नाहीं.'

असें म्हणून पूजनी उडून गेली. राजा आ वासून पहात राहिला.

—उषाकान्त

स. न. वि. वि.

दीपावली सप्टेंबर महीन्याचा अंक वाचला. नव्यानेंच प्रवेश करणारी बुद्धीबळ स्पर्धा वाचून अतिशय आंनद वाटला. ही अभिनव योजना 'दीपावली'च्या परंपरेला शोभणारी असून वाचकांच्या बुद्धीस ती चांगलें खाद्य पुरवून मनोरंजनही साधेल. सर्वत्र हीचें स्वागत होईल याविषयीं शंका नाहीं. आशा आहे मुळांत लहान स्वरुपांत जन्मणारी ही स्पर्धा लौकरच फोफावेल व कायम स्वरुप धारण करील. या योजनेबद्दल आपलें अभिनंदन ! दीपावलीस शुभेच्छा चिंतून पुरे करतो.

आपला

**ज्ञानेश्वर रामचंद्र धुमाळ**, भुसावळ

### चित्र छपाईंत धमाल

स. न. वि. वि.

आपल्या आगळ्या वैशिष्ट्यासाठीं प्रसिद्ध असलेला आपला 'दीपावली'चा दिवाळी अंक संपूर्ण वाचल्यानंतर खरंच तो नेहमीची वैशिष्ट्यें राखून आहे याची खात्री पटली. गेल्या वर्षी 'दीपावली'तील ऑफसेट चित्रछपाई पाहून तर फारच निराशा झाली. मात्र यंदाची 'वसुंधरेचें स्तन्य उसळलें' ही चकाकीदार आणि आणि कलात्मक चित्रें पाहून मन फारच उल्हसित झालें व गतवर्षीची निराशा एकदम विरून गेली. खरं म्हणजे इतक्या उत्कृष्ट छपाईच्या बाबतीत आपण कुठल्या पद्धतिचा आविष्कार केला असेल हें एक कोडंच आहे. पण यंदा चित्र छपाईच्या बाबतींत मराठींत तरी पहिल्यांच अशा तऱ्हेची छपाई करून धमाल उडवून दिली...हेहि तेवढेंच खरें ! असो, या प्रगत वाटचाली बद्दल आपलें अभिनंदन !

आपला

**अंबादास सी. वागूल**, धुळें

### मौलिक विनोद !

स. न. वि. वि.

दीपावलीचा दिवाळी अंक वाचल्यानंतर राहावलें नाही म्हणून हे पत्र लिहित आहे. अंक चिंतनीय व हास्य विनोद अशा संमिश्र साहित्यानें नटलेला आहे. यंदाच्या दीपावलींत आपण विनोदावर नेहमीपेक्षा जास्त भर दिलेला पाहून समाधान गवसलें. वास्तविक सात्विक विनोदाचा आनंद देणारी मासिकें फारच थोडीं आहेत. त्यांतल्या त्यांत दीपावलींतील विनोद चांगला व दर्जेदार वाटला हे विशेष.




श्री. पु. ल. देशपांडे यांचा 'मी व इतर प्राणी प्रामुख्याने कुत्रा' हा विनोद प्रचुर लेख त्यांच्या शैलीचा आगळा नमुना म्हणावा लागेल. श्री. शामराव ओक, बाळ सामंत, वसंत सबनीस, विजय तेंडुलकर व जयवंत दळवी यांचे साहित्यहि त्यांची विनोद परंपरा राखून आहे.

मात्र मुख्यत्वें उल्लेख करायचा आहे तो हास्य व व्यंग चित्रमालांचा. आपल्या सुजाण कुंचल्यांतून रंगलेली राजकीय घडामोडींतील विनोद वेंचणारी 'चालू जमान्यांतील दिव्य महोत्सव' ही वस्तुस्थितिचा दांभिक स्फोट करणारी व्यंगमाला खूपच आवडली. त्यांतल्या स. का. व मो. दे. चा गणपति बाप्पा व नेहरूंचा सत्ताधिकारांतला 'गोविंदा' मार्मिक विनोदाचा उत्कृष्ट नमूनाच म्हणावा लागेल. लेखकांच्या नाना कला व रात्रंदिन आम्हां युद्धाचा प्रसंग ही विनोद मालिकाहि कल्पक आहे. घोषवाक्यांची 'आणीबाणी' व 'प्रेमा तुझा रंग असा' ही रंगीत विनोद चित्रें ही त्यांतील विनोद चांगलाच प्रगट करणारी आहेत.

आपल्या या अपूर्व यशाबद्दल आपलें अभिनंदन !

आपला

**विनय तेलंग**, नागपूर

### संयम ठेवणारी अश्वमुद्रा

स. न. वि. वि.

मी आपल्या दीपावलीचा नियमित वाचक आहे. आपण आपल्या मासिकांतून जे नवनवीन प्रयोग करीत आहांत तें पाहून माझ्यासारख्या नाविन्याच्या चाहत्याला एक प्रकारचा आगळाच आनंद मिळतो.

मुद्दाम पत्र लिहिण्याचें कारण म्हणजे आपल्या दीपावली वार्षिकांतील 'अश्वमुद्रा' ही डॉ. कु. दमयंति सरपटवार यांची गोष्ट. या गोष्टीचा उल्लेख एवढ्यांच करितां कीं लेखिका शेवटपर्यंत वाचकाला रंगवित नेते अन् शेवटीं एक गोडसा धक्का मिळतो. सहजच तोंडून उद्गार बाहेर पडतात. 'अच्छा ! अशी गम्मत होती तर-!'

गोष्ट शृंगारानें परीपूर्ण आहे. पण लेखिकेनें कोठेंही संयम सोडलेला नाहीं. आपल्या लेखणीवर काबू ठेवून वाचकांच्या अंतर्मनाला गुदगुल्या करण्यांत लेखिकेनें जबरदस्त यश मिळलेलें आहें. लेखिकेचें अभिनंदन !

इतर लेखकांत—पु. लं. च्या पाळीव प्राण्यांनीं बरीच करमणूक केली. जयवंत दळवी, वसंत सबनीस, बाळ सामंत यांचेही लेख आवडले.

आपल्या दीपावलीचा उत्तरोत्तर उत्कर्ष होवो व नवनवीन असे आणखींही कांहीं प्रयोग पहावयास मिळोत ही सदीच्छा.

आपला,

**कृष्णकुमार सांभारे**, मुगभाट






अनुक्रमणिका



*त्यानें डोळे मिटले.*
*शुद्ध निर्मल*
*आकार*
*लावला: चंदन*
*त्या*
*आवाजानें मोहरून*
*गेली. पण...*
*त्याचवेळीं त्याच्या*
*डोळ्यांतून अश्रुधारा*
*वाहूं लागल्या...*

**उपेंद्रनाथ** पलंगावर बसला होता. खोलीचा दरवाजा आंतून लावला होता. समोरच्या टेबलावर सोड्याच्या दोन बाटल्या, ग्लास, व्हिस्कीची बाटली होती. बशींत बर्फाचे खडे ठेवले होते. उपेंद्र त्याकडे पहात होता. अचानक एक निश्वास त्याच्या मुखांतून बाहेर पडला. डोळे भरून आले. गडबडीनें त्यानें बशींतले दोन बर्फाचे खडे ग्लासमध्यें टाकले. व्हिस्कीनें अर्धा ग्लास भरला. सोड्याच्या मिश्रणाबरोबर तें मद्य फेंसाळलें. मादक कडवट वास खोलींत दरवळला. उपेंद्रनें तो ग्लास हातांत घेतला. त्या थंड स्पर्शाची जाणीव त्याला अस्वस्थ करीत होती. क्षणांत त्यानें तो पेला ओठाला लावला. ओठाचा पेला दूर न करतां त्यानें तें मद्य संपवलें. घशांतून उतरणारा तो उष्ण प्रवाह त्याला जाणवत होता. घशांतून, नाकांतून वाफा येत असल्याची त्याला जाणीव झाली. मस्तकांत चढणाऱ्या त्या वेगळ्या संवेदनांनीं क्षणभर तो सुखावला. पण दुसऱ्याच क्षणीं त्याचे विचार उफाळून आलें. सारं त्याला आठवलं. नेहमीचेंच दुःख आज त्याला तीव्रतेनें जाणवत होतें.

उपेंद्रनाथ दिल्लीच्या सत्कारासाठीं आला होता. भारतांतल्या श्रेष्ठ कलावंतांचा सत्कार विद्याभवनांत राष्ट्रपतींच्या हस्तें झाला होता. जेव्हां उपेंद्रनाथाचें नांव पुकारलें गेलें तेव्हां उपेंद्रनाथाला उभें रहाण्याचेंहि बळ नव्हतें. कष्टानें तो उभा राहिला आणि जें अपेक्षिलें होतें तेंच घडलें. साऱ्या सभागृहांत टाळ्यांचा कडकडाट झाला. हें नेहमींच घडत असे. संकोचानें उपेंद्रनाथ व्यास-पीठावर आला. गायक म्हणून जी त्याची ख्याती होती त्याहिपेक्षां त्याच्या रूपाची ख्याती फार मोठी होती. उपेंद्रनाथाची ठेंगणी, सावळ्या वर्णाची, बटबटींत डोळ्यांची मूर्ति जेव्हां प्रेक्षकांसमोर येई तेव्हां रुपाची टाळी प्रथम पडे. परमेश्वरानें उपेंद्रनाथाला फक्त गंधर्वांचा आवाज दिला होता. त्या उपकाराची भरपाई रुपानें करून घेतली होती. जेव्हां उपेंद्र सन्मानासाठीं व्यासपीठावर आला तेव्हां पडलेल्या टाळ्यांनीं त्याचें मन संकोचून गेलें होतें. राष्ट्रपतींच्या हस्तें मिळालेलें रौप्य गौरवचिन्ह व मानधन स्वीकारून तो आपल्या जागीं बसला. कार्यक्रम संपला. साऱ्या कला-



अनुक्रमणिका




—रणजित देसाई

-वंतांच्या भोंवतीं स्वाक्षरी घेण्यासाठीं लोकांचे घोळके जमले होते. चाहत्यांची गर्दी उडाली होती. पण उपेंद्राकडे कुणाचें लक्ष नव्हतें. अस्वस्थ मनानें तो विज्ञानभवनांतून बाहेर पडला.

ह्या साऱ्या आठवणीनें उपेंद्रनाथ पुरा बेचैन झाला. त्यानें पुन्हां पेल्यांत मद्य ओतलें. विचार करीत तो मद्य घेत होता. वयाच्या अवघ्या छत्तीसाव्या वर्षी संगीत साधनेंत त्यानें नैपुण्य मिळविलें. श्रेष्ठ मान मिळविला. तें यश त्याला सुखवित नव्हतें. एकाकी आयुष्याचा त्याला उबग आला होता. पेला संपवून तो उभा राहिला. भिंतीवरच्या आरशांत उपेंद्र आपलें रूप न्याहाळत होता. तें रूप पाहाणं त्याला असह्य झालें. दरवाजा उघडून तो बाहेर आला. खोलीला कुलूप लावलें. हॉटेल मालकांकडें त्याचें लक्ष जातांच मालकानें विचारलें,

'बाहेर जाणार ?'

'हां !' उपेंद्र म्हणाला.

'टॅक्सी बोलावूं ?'

'हां !'

मालकानें पोऱ्याला पाठवला. उपेंद्र गॅलरींत जाऊन उभा राहिला. रात्र पडली होती. दिल्लीचे दिवे लुकलुकत होतें. कुठेंतरी उतरलेल्या सर्कशीचे प्रकाशझोत आकाशांत फिरत होते. उकाडा जाणवत होता. उपेंद्रानें आपल्या काळ्या अचकनच्या गळ्याजवळच्या गुंड्या मोकळ्या केल्या. त्याच वेळीं मागून हांक आली,

'साहेब !'

'हां !' उपेंद्रानें मागें पाहिलें.

'टॅक्सी आली.' पोरगं सांगत होतं.

'हां !' म्हणत उपेंद्र वळला आणि जिना उतरूं लागला.

उपेंद्र टॅक्सींत बसतांच टॅक्सीवाल्यानें विचारलें,

'कहाँ जानेका साब ?'

'कहाँभी चलो. घुमेंगे !' उपेंद्र म्हणाला.

टॅक्सीवाला बुचकळ्यांत पडला होता. सावरत त्यानें विचारलें.

'साब, ऐश करना है ?'

'नहीं !'

'हवा खाना है ?'

'नहीं !'

'गाना सूनोगे साब ?' भीत भीत ड्रायव्हरनें विचारलें.

'गाना !' क्षणभर उपेंद्रानें विचार केला व म्हणाला, 'हां ! चलो.'

गाडी भरधाव जात होती. रस्त्यावरचे दिवे धावत होते. डोळे मिटून उपेंद्र बसला होता. डोळे जड झाल्यासारखें वाटत होतें. उघडण्याची इच्छा असूनहि डोळे उघडत नव्हतें. कपाळावर घाम डंवरला होता. गाडी थांबली

'साब !'

'अं !' डोळे उघडत उपेंद्रानें विचारलें.

'ठिकाणा आगया साब !'

गाडी उभी होती. रस्ता विजेच्या प्रकाशांत झगमगत होता. ड्रायव्हर उपेंद्राकडे पहात होता. घाबरून त्यानें विचारलें,

'ठीक तो है बाबूजी ?'

'हां !' म्हणत उपेंद्र उतरला. खिशांतून दहाची नोट काढून त्यानें ड्रायव्हरच्या हातीं दिली. ड्रायव्हर मोड शोधूं लागलेला पहातांच तो म्हणाला,

'रहने दो !'

'गाडी खडी करनी है साब ?'

'नहीं ! तूम जावो !'

सलाम करून ड्रायव्हरनें गाडी सुरूं केली.

उपेंद्रनाथानें नजर वर केली. सारा रस्ता न्याहाळला. पानपट्ट्यांची मेवामिठाईचीं दुकानें दुतर्फा सजली होती. गजरे, फुलछड्या विकणारी पोरें हिंडत होती. माड्यांवरून गाण्याचे सूर, नुपूरांचा आवाज मोहवत होता. उपेंद्राला आपला तोल सावरणें जड जात होतें. नजीकच्या माडीकडे त्याचें लक्ष गेलें. प्रथम कोठेंतरी बसणें त्याला आवश्यक होतें हें उपेंद्राला जाणवत होतें आणि तो सरळ माडीच्या जिन्याकडे वळला.

गाण्याचे सूर येत होते. नुपूरांचा आवाज उठत होता. उडत्या चालीच्या गझलाच्या तालावर तबला घुमत होता. सारंगीचे सूर उठत होते. उपेंद्र जेव्हां वर गेला तेव्हां साऱ्यांच्या नजरा त्याच्यावर खिळल्या. बैठकीवर दहापंधरा इसम बसले होते. बहुतेक पंजाबी होते. मध्यभागी तरुण युवती नृत्य करीत होती. गात होती. उपेंद्र नजीकच्या बैठकीवर बसला. साऱ्यांच्या चेहऱ्यावर नाराजी स्पष्ट दिसत होती. उपेंद्राला न पाहिल्यासारखें करून नर्तकी गात होती. नाचत होती. तिच्या फेराबरोबर तिचा घागरा उंचावत होता. मादक नजरेनें ती आव्हान करीत होती. श्रृंगारिक गझलांचा आदा समजाऊन देत होती. पण बैठकींत पूर्वीची दाद मिळत नव्हती. नर्तकीनें कशीबशी गझल पुरी केली आणि बैठक घेतली. कुणाला काय बोलावें हें सुचत नव्हतें. साऱ्यांचें लक्ष अनोळख्या पाहुण्याकडे लागलें होतें. नर्तकी एकदम उठली आणि उपेंद्राजवळ जाऊन तिनें आदाब केला. उपेंद्रानें मान झुकविली. नर्तकी हंसून म्हणाली,

'मी ओळखलं नाहीं आपल्याला.'

'हां ! मी नवीनच आलों.' उपेंद्र म्हणाला.

'प्रथमच गाणं ऐकायला आलांत वाटतं ?' नर्तकीनें खोचकपणें विचारलें.

उपेंद्र कष्टानें संताप आवरत म्हणाला,

'हां ! आपणहून गाणं ऐकण्याची ही पहिलीच वेळ आहे.'

'मोठे शौकिन दिसता गाण्याचें ! काय गावं अशी आज्ञा आहे ?'

उपेंद्र उठला. खिशांत हात घालून त्यानें दहाची नोट काढली. बैठकीवर ती नोट फेंकत तो म्हणाला,

'जातो.'

'मग हे पैसे कसले ?' नर्तकीनें विचारलें.

'गाणं न ऐकण्याचे ! तो त्रास चुकला त्याचे.'

उपेंद्र झरकन् वळला. जिना उतरत असतां त्याच्या कानांवर कोठींतले हंसणें आलें. संतापाच्या तिरमिरीनें उपेंद्र रस्त्यावर आला. मध्यरात्र होत आली होती. रस्त्यावरची वर्दळ



## विराम

वाहत्या वाऱ्याला
विसाव्याचा ध्यास
भटक्या पाण्याला
सागराचा भास

धांवरे आकाश
घे लयाची आंस
धरणीची भिंगरी
तिला स्थिरतेची आंच—

अगदीं असेंच
अचपळ बडबडे
मन माझें झुरें
स्तब्ध मुग्धतेसाठींच—

## जीवन-मूल्य

असा कसा जीवनाशीं
अर्थ खेळे लपंडाव
आशा निराशेच्या राशी
करिती दोन तुकडे एक घाव

तुझ्या सान्निध्यांत वाटे
पृथ्वी मोलाचे हें जिणे
विरहानें तुझ्या पटे
उगा भूमीस भार होणे—

असा कसा जीवनांत
अर्थ करि येरझाऱ्या
अशा कशा तव-प्रीतींत
फोल माझ्या गमजा साऱ्या ?

असें कसें क्षणामध्यें
जीवन-मूल्य घसरते
पृथ्वीमोलाचे हे जिणे
कवडीं मोलाचे वाटते

—सौ. रमा देशपांडे

तुरळक होत होती. बरीचशीं दुकानें बंद होत होतीं. उपेंद्र क्षणभर उभा राहिला. त्याच्या डोळ्यांवर झांपड येत होती. फार वेळ उभं रहाता येईल असं त्याला वाटत नव्हतं. नजरेंत वहान दिसत नव्हतें. उपेंद्रानें कष्टानें पावलें उचललीं. कांहीं पावलें गेल्यावर तो थांबला. त्याचं लक्ष शेजारच्या पानपट्टीवाल्याकडे गेलें. नकळत तो तिकडें वळला.

'एक तमाखूं पान बनाव भाय ! जाफरानी पत्ती, किमाम...' उपेंद्रानें सांगितलें.

'जी हुजूर' म्हणत पानपट्टीवाला पान जुळवूं लागला.

पानपट्टीच्या दुकानाजवळ उभा असलेला तरुण उपेंद्राला निरखीत होता. उपेंद्राची नजर वळतांच त्यानें लवून कुर्निसात केला. लखनवी कुडता, विजार परिधान केलेला तो तरूण उपेंद्राला निरखीत उभा होता.

'गाणं ऐकायला आला होता हुजूर ?' त्या तरूणानें विचारलें.

'हां !'

'आतां पूर्वीचं गाणं राहिलं नाहीं.' खानदानी कोठ्या केव्हांच बसल्या. सारा चालू मामला आहे. ह्या सिंधी पंजाबींनीं कोठ्या पार बिघडवून टाकल्या. साधी ऐकायला मिळत नाहीं.'

'हां !'

'केव्हां आलांत हुजूर ?'

'काल ! तूं मला ओळखतोस ?'

'आपल्याला कोण ओळखत नाहीं हुजूर ?

'आपली तारीफ ?'

'मी मामुली आदमी ! मोमीन म्हणतात मला. इथें एका कोठीवर तबला वांजवतो.'

'वरीं गातें ?' 'उपेंद्रानें विचारलें.'

'गझल, ठुमरी, खास नाहीं, ऐकणार ?'

, हां ! चल. लांब नाहीं ना ?'

'छा ! इथंच तर आहे.'

'चल !'

पानवाल्यानें दिलेलें पान चघळत उपेंद्र वळला. मोमीननें पट्टयांचा पुडा घेतला आणि तो उपेंद्राच्या पुढें चालूं लागला. उपेंद्र मागून जात होता.

मोमीन पाठोपाठ जिना चढून जेव्हां उपेंद्र माडीवर गेला तेव्हां त्याचे पाय तेथेंच थबकले. क्षणभर त्याची बेहोषी दूर झाली. सुरेख साधी बैठक तेथें मांडली होती. शामदाण्याचा मंद उजेड फांकला होता. दोनचार रईस बैठकीवर बसले होते बैठकीच्या समोर बसून एक प्रौढा अदा करून गात होती. उपेंद्र तेथें जातांच सर्वांची नजर उपेंद्राकडे वळली. उपेंद्र त्या प्रौढेला निरखीत होता. उपेंद्राला पहातांच तिच्या चेहऱ्यावर आश्चर्य उमटलें. बसल्या जागेवरून तिनें आदाब केला. उपेंद्र बैठकीवर बसला.

उपेंद्र त्या बाईला, निरखित होता. तिचा आवाज मोठा नाजूक होता. आवाजांत दर्द होता. तिचं वय पस्तिसीच्या आंत बाहेरच होतं. तिचा गोरा रंग, गोल चेहरा आणि मादक बदामी डोळे लक्ष वेधून घेत होते. उपेंद्राची नजर चुकवून तिनें गझल पुरी केली. मोमीनला बोलावून तिनें कानांत कांहींतरी सांगितलें. बघतां बघतां बैठकीवरचे रईस उठले आणि उपेंद्राकडे पहात निघून गेले. ती गायिका उपेंद्राजवळ आली आणि म्हणाली,

'हुजूर, आपण तेथें बसावं.'

तिनें दाखविलेल्या जागेकडे उपेंद्रानें नजर टाकली. मुख्य बैठकीवर बसण्याची विनंती ती करीत होती. नकळत उपेंद्र उठला आणि बैठकीवर जाऊन बसला. त्या गायिकेची धांवपळ उडाली होती. कांहीं क्षणांत साजिंद्यानीं मिठाईच्या बशा समोर आणून ठेवल्या. उपेंद्र म्हणाला,

'बाईजी !'

'मेरा नाम चंदन आहे हुजूर !'

'चंदन ! मी मिठाई खायला आलों नाहीं. गाणं ऐकायचं आहे. मला.'

चंदन लाजली. ती म्हणाली, 'गरीबाचीं थट्टा करतां हुजूर !'

'कां ?'

'आपल्यासमोर काय गाऊं मी ?'

'मला ओळखतेस ?'

'आपल्याला कोण ओळखत नाहीं. आपली ओळख नसली तरी खूप गाणं ऐकलंय मी ! आपल्यासमोर जबान तरी उघडेल कां माझी ?'

'चंदन ! खरंच गाणं ऐकायला आलोंय मी इथं. तूं गाणं नाहीं ऐकवलंस तर वाईट वाटेल मला !'

चंदन हताश झाली. तिनें साजिंद्याकडे पाहिलं.

"गाणार ना ?' उपेंद्रानें विचारलें.

'काय गाऊं ?'

'कांहींही गा ! जें ऐकून माझ्या गाण्याचा मलाच विसर पडेल !'










चंदननें उपेंद्रासमोर बैठक घेतली. सारंगियानें गज फिरवतांच सारंगीचे सूर ओघळले. क्षणभर आवाज स्थिर करून चंदननें गझल गायला सुरवात केली. चंदन डोळे मिटून संथ लईतील गझल गात होती. लोडाला टेकून उपेंद्र ती गझल ऐकत होता. चंदन गात होती...

**छोडन जइयो साथ**
**बिरहा लगाये घातरेऽऽ**
**क्या कयामत है बरसातमें भी दिल जलता है**
**अजि क्या कहूँ निंदकोभी निंद आ जाती है**
**नैना लगेगी बरसातऽऽ**
**छोडन जईयो साथऽऽ**

गझल संपली आणि चंदननें डोळे उघडले. तिच्या आश्चर्याला पारावार राहिला नाहीं. उपेंद्राच्या डोळ्यांतून अश्रुधारा वहात होत्या. ते अश्रु पुसण्याचाहि प्रयत्न तो करीत नव्हता. चंदननें साथीदारांना खुणावलें. ते मुजरा करून निघून गेले. उपेंद्राच्या जवळ जात चंदन म्हणाली,

'काय झालं!' गाणं आवडलं नाहीं ना! तरी मी सांगितलं होतंऽऽ'

'नाहीं चंदन, गाणं फार आवडलं. एवढी सुरेख गझल मी आजवर ऐकली नव्हती. माझ्या डोळ्यांतल्या पाण्याला फारशी किंमत नाहीं.'

उपेंद्रानें थरथरत्या हातानें रुमाल काढला. आपले डोळे टिपले. चंदन उठून आंत गेली. जेव्हां ती बाहेर आली तेव्हां तिच्या माथीं बिंदिया नव्हती. हातांत पल्ले नव्हते. पांढरें शुभ्र पातळ नेसून ती आली होती. मिठाईकडे बोट दाखवत ती म्हणाली,

'मिठाई घेतली नाहींत!'

'नको चंदन! एवढीहि भूक राहिली नाहीं. पण तुझे साजिंदे कोठें गेले!'

'एक वाजून गेला ना! त्यांना जायला सांगितलं.'

'फार वाईट केलंस.'

'कां! गाणं ऐकायचं होतं!'

'अहं! पण आतां कुणाच्या मदतीशिवाय मी येथून जाऊं शकेन असं वाटत नाहीं. आता ती परिस्थिति राहिली नाहीं.' उपेंद्र हंसून म्हणाला.

'आपली हरकत नसेल तर झोपाना येथेंच.'

'चालेल!' उपेद्रानें विचारलें.

'तें माझं भाग्य समजेन मी.' चंदन म्हणाली.

उपेंद्रानें आचकनचीं बटनें काढायला सुरुवात केली. चंदन उठून आंत गेली. आचकन कष्टानें काढून उपेंद्रानें लोडावर टाकली आणि गिर्दीवर त्यानं अंग झोकून दिलें. पावलांचा आवाज झाला पण डोळे उघडण्याचें त्राण उपेंद्राचें ठायीं नव्हतें. जवळ आलेल्या चंदनची जाणीव उपेंद्राला झाली. केंसांतून फिरणाऱ्या बोटांचा स्पर्श जाणवला. नाजूक हांक कानावर आली.

'बाबूजीऽऽ'

'हं' डोळे न उघडतां उपेंद्र पडून राहिला.

'बाबूजीऽऽ'

'हं' म्हणत उपेंद्रानें डोळे उघडले. चंदनकडे पाहिलें. नजिक शामदाणी घेऊन चंदन बसली होती. सारे दिवे मालवले होते. त्या शामदाणीच्या प्रकाशांत दिसणारें चंदनचें सौंदर्य उपेंद्र निरखित होता. नजर स्थिर करीत, स्वतःला सावरत उपेंद्र हंसून म्हणाला,

'चंदन, फार झोंप आलीय! बरेंच दिवसांनीं अशी झोंप येते आहे. झोपूं?



विझू विझू झाले

विझू विझू झाले
प्रकाशाचे सूर
मनासहि आला
सांवल्यांचा पूर
फुटूनहि लाट
उदास हा कांठ
गळ्यांतलें गीत
दाटलें डोळ्यांत
रेंगाळले पाय
अज्ञाताचे वाटे
उजळलें खोल
अदृष्टाचें नातें.

फुटे प्राजक्ताचा सूर

दुरावतां आज
विकटलीं मनें
उन्हांत चांदणें
फुलों आलें
पोळतांना कळे
वैशाखाची माया
शीतळली काया
आठवांत
वरखालीं फक्त
जीवघेणी आग
आषाढाशीं संग
जाणीवेचा

दूरावतां आज

निरोपिल्या दिवसाचें
नातें नारिंगी ढळतें
मालवत्या क्षितिजाला
खोल कांहींसें खुपतें
कळ नावरून झोंबे
काळेसांवळे काहूर...
सांकळल्या वेदनेला
फुटे प्राजक्ताचा सूर

—शंकर रामाणी

चंदननें होकारार्थी मान हलवली आणि उपेंद्रानें परत गिर्दीवर मान टाकली.

जेव्हां उपेंद्र जागा झाला तेव्हां क्षणभर आपण कोठें आहों हें त्याला समजलें नाहीं. पहाटेचा उजेड कोठींत फांकत होता. उपेंद्राचें लक्ष उशाकडे गेलें. तेथें शामदाणी जळत होती. हातांतल्या पंख्यानें चंदन वारा ढाळीत होती. उपेंद्र उठत म्हणाला,

'कोण ! चंदन झोपली नाहींस तूं ?'

'निंद नहीं आयी बाबूजी'

'सच ? क्यूं ?'

'निंद कां येत नाहीं हें कोण सांगणार बाबूजी ?'

'हां ! तेहि खरंच ! उपेंद्रानें क्षणभर चंदनला निरखलें आणि एकदम विचारलें,

'चंदन, खरंच माझं गाणं तुला आवडत ?'

'हां ! दिल्लीला तुमचं गाणं झांलं आणि मी ऐकलं नाहीं असं झालं नाहीं.'

'कोणता राग आवडतो तुला ?'

'आपण एकदा कलावती गायला होता. आठवतं ?'

'तो राग कोण विसरेल ? ऐकायचा आहे तुला ?'

'आत्तां ?' चंदननें आश्चर्यानें विचारलें.

'हां ! तानपुरा घे. घे म्हणतो ना ?'

उपेंद्र चुळ भरून बैठकीवर आला. बैठकीवर आणून ठेवलेला तानपुरा आपल्या सुरांत लावला. एकवार चंदनकडे नजर टांकून तो म्हणाला,

'ऐक चंदन !'

'उपेंद्रानें डोळे मिटले. शुद्ध निर्मळ आकार लावला. त्या आवाजानें चंदन मोहरून गेली. पहाटेच्या वातावरणांत उपेंद्राची कलावती फुलत होती. देहभान हरपून उपेंद्र गात होता.

'पिया घर आऽऽ'

त्या आर्त; व्याकूळ करणाऱ्या सुरांनीं वातावरण भरून गेलें होतें. चंदन भारावून कलावती ऐकत होती. गाण्याशीं एकरूप होऊन गेलेल्या उपेंद्राला ती निरखित होती. गाणं संपलं. उपेंद्रानें तानपुरा खाली ठेवला आणि वर पाहिलें. चंदनच्या डोळ्यांतून अश्रु झरत होते.

'चंदन काय झालं ?'

'काय झालं बाबूजी ? तुम्हांला समजायचं नाहीं तें. आपल्यासारखा थोर गवयी एका सामान्य गायिकेच्या कोठीवर येतो. रहातो. एवढंच नव्हे तर तिच्यासमोर बसून गातो. खरं सुद्धां वाटायचं नाहीं कुणाला. ह्याचा आनंद काय असतो; हो केवढी भाग्याची गोष्ट असते हें तुम्हांला कसं कळणार ? खरंच असं गाणं ऐकलं कीं भान हरपून जातं. वाटतं...'

'काय ?'

'इथंच जीवन संपवावें.'

उपेंद्र हंसला. चंदननें विचारलें.

'कां हंसलांत ? खोटं वाटलं ?'

'नाहीं चंदन ! तूं म्हणतेस त्यांत कांहींच खोटं नाहीं. कलावती माझ्याइतकी चांगली कोणीं गाणार नाहीं. कोणी गायला तर हा राग एवढा रंगणार नाहीं.'

'कां ?'

'कलावती म्हणजे चार सुरांची किमया आहे. आपल्या प्रेयसीच्या विरहानें व्याकूळ झालेल्या प्रियकराची हांक ज्याला समजते तो हा राग गाऊं शकतो. आणि माझ्याइतका हा कोण गाईल ?' अस्वस्थ होऊन विषय बदलत उपेंद्र म्हणाला, 'चंदन, पहाट झाली. जातो मी.'

'उपेंद्र उठला. अचकन उचलली. चंदननें विचारलें,

'परत केव्हां याल ?'

'आतां परत येणं व्हायचं नाहीं. उभ्या आयुष्यांत एवढी एकच रात्र चांगली गेली. ह्या रात्रीला धक्का लावायचें धाडस माझ्या अंगीं नाहीं. तो प्रयोग मी करणार नाहीं.'

'मी नाहीं समजलें.'

'तुला तें समजायचें नाहीं.' उपेंद्रानें आचकन घातली. खिशाचा जडपणा त्याला जाणवला. त्यानें खिशांत हात घालून निळी मखमली पेटी बाहेर काढली. ती उघडतांच त्यांतील रौप्यपदक चमकलें. तें रौप्यपदक हातांत घेऊन निरखित उपेंद्र म्हणाला,

'हें काल मला मिळालं. मोठ्या सन्मानाचं हें प्रतिक आहे. त्याच भावनेनं ह्याची जपणूक करणारं माझ्या आयुष्यांत कोणी नाहीं. कदाचित ह्याची जपणूक तुझ्या हातून होईल ! हें ठेव तुझ्याकडे. ह्यापेक्षां तुला देण्यासारखें माझ्याजवळ कांहीं नाहीं. येतो मी.'

हातीं दिलेल्या पदकाकडे विस्फारित नेत्रांनीं चंदन पहात होती. जिन्यावरून अस्पष्ट होत जाणारीं पावलें तिला ऐकूं येत नव्हती...

अनुक्रमणिका






अनुक्रमणिका








१३ **दारांतून** खुशालीनं पुकारलं,' 'पुढला नंबर. चल हो आंत.

चारपांच रू पोरं पुढं झालीं. मिसरूड फुटूं लागली होती-नव्हती अस वय भे ट, गवाळ चेहरा. लाचार कोडगेपणाची वृत्ति.

'मायच्यानूं, सगळ्यांचं रे काय काम ? हिथं कोणाला खांदा द्यायला निघालांत ? कंपनीला !' खुशाली ओरडला.

आतां इतक्या दिवसांच्या अनुभवानं त्याला ठाऊक झालं होतं कीं या लोकांपुढं ओरडून फायदा नाहीं. त्यांना कांहीं ते समजत नव्हतं. एकजमत अडाण्यांची औलाद ही घाट्यांची-किती बोला, कांहीही सांगा ! समज पडणार नाहीं. जीव गेला तरी उमज येणार नाहीं. एकदा काय डोचक्यांत घेतील तेंच कायम. तें आणि बस्स तितकंच करणार. निष्कारण ताप आपल्यालाच. म्हणजे सांगून फुकट तोंड दुखवून घ्यायचं. यांना मात्र काडीचीसुद्धां अक्कल येणं अशक्य.

खुशालीला हें खूप ठाऊक होतं आणि तरीही हात उगारून तो त्यांच्या अंगावर आलाच, 'फक्त एकच असामी—'

'मुकादम, सगळे एकत्र आहोंत कीं आम्ही–' असा अजीजीचा जाब आणि खालीं मान घालून लोचटपणानं उभं रहाणं.

सगळ्या घाट्यांची ही एकच तऱ्हा. भाषासुद्धां ठराविक. खुशालीलासुद्धां ती तोंडपाठ झाली होती. आणि त्यावर त्याचं उत्तरही आतां ठरून गेलं होतं. त्यानं म्हटलं, 'अरे तुम्ही नाही–तुमची बाई एक असेल–काय ?'

आणि तो पोट धरधरून हंसत सुटला. नेहमीसारखाच. त्याच्या बोलण्याचा अर्थ परगांवच्या या पाव्हण्यांना कितपत कळला असेल देवजाणे ! पण मुकादम इतका हंसतो आहे तर आपणसुद्धां हंसलं पाहिजे हें त्यांना ठाऊक होतं आणि म्हणून ते देखील हंसूं लागले. नाहींतरी कंपनींत नोकरी हवी असली तर पहिला हा मुकादम खुश करावा लागतो असा महत्वाचा सल्ला गांववाल्यांनीं त्यांना एस्. टीं.त चढेपर्यंत तरी पंचवीसवेळां दिला होता.

'भांचोद् ! चुप्प !' मुकादम उखडला, 'साहेबाच्या समोर हंसायचं नसतं. हां !'

असिस्टन्ट मॅनेजर विजय शिर्केनं हंसत त्यांच्यापैकीं एकाला विचारलं, 'नांव काय तुझं ?'

तसा तो दचकला, कमालीचा घाबरला. नांवावरच घसरत राहिला. '–न–न–नांव—'



**पूर्व कथा सूत्र...**

*नव्य कंपनीच्या उद्घाटनाची वेळ जवळ आली होती. गांवांतली पोरं भजन गात निघाली. आतेबाई व दाजी नाबराची मुलगी वासंती पण जायला निघाल्या होत्या. पण मध्येंच दाजीचं व आतेबाईचं मांडण उपटलं. पण वासंती हळूच निसटली तिथून. रस्त्यांत तिला विजय भेटला. दोघांची नजरानजरा झाली.*

*आणि इकडे उद्घाटनाला डेप्युटी मिनिस्टर सावंत आले. बॅण्ड वर धूना वाजूं लागल्या. सावित्री गोड मुरके घेऊन नाचूं लागली आणि त्याचवेळीं कुळकर्णी पकडल्या गेला. 'पकडो...पकडो' चा गोंधळ उडाला...आणि तेवढ्यांतच डोंगरमाथ्यावरून दाजी ओरडला, 'कोण पकडतो साला...' सावंत निमूटपणे ऐकत राहिले तें... आणि त्याचवेळीं डोंगरमाथा आवाजांनीं पेटला...दुमदुमला...*

**आतां पुढे वाचा...**





अनुक्रमणिका

# अभिमाचा डोंगर

'दुसऱ्या कुणीसा मोठा धीर करून जाब दिला,' लिवा–विष्ण्या मोरबाळ्या. '

' त्याला बोलूं दे कीं ! का आपलं नांवसुद्धां ठाऊक नाहीं याला ?'

' सांग रे, टाक सांगून साहेबाला, ' बाकीची पोरं पहिल्याच्या कानाला लागलीं.

तसा घामाधूम होत पहिलं पोरगं कसंबसं म्हणालं, 'विशण्या मोरबाळ्या—

' गांव ! दुसरा प्रश्न.

' हेंच कीं ! म्हणजे आम्हा सगळ्यांचा गांव साहेब एकच बघा. ह्या अर्जुन्याचा, ह्या महादेवाचा आणि माझा. काय ? घरं तिघांची तीन. गांव बाकी एकदम एक.' 'नांव ऐकून साहेब खवळलेला दिसला नाहीं तशी या विष्णु मोरबाळयाची भीड थोडी चेपली होती. मान वेळावीत तो अऱ्हाळपऱ्हाळ बोलूं लागला, 'हा भिमा तेव्हढा आमच्या गांवचा नाहीं. म्हणजे. त्याचं काय आहे. अल्याड हिथं आला आमचा गांव, मध्यें आहे नदी आणि लागून पल्याड बघा ह्या भीमाचा गांव. तीन कोसांवर म्हणा ना ! काय रे तितकंच असेल ! का कसं ?-सांग कीं साहेबांना. '

'होय असेल, तितकंच असेल साहेब.' भीमाचा निर्वाळा मिळाला. ' म्हणजे डुंबायला एकत्र जमतोंच कीं आम्ही नदीवर. आणि गुरं सुदीक एकाच रानांत चरतात.'

**—श्रीराम कामत**

'पण हें गांव–नांव काय ?' विजयनं त्याला अध्यावर तोडला. म्हणजे हें नेहमीचं होतं. या लोकांना मुख्य मुद्यावर यायला बराच वेळ लागे. कधीं कधीं मुद्दा राहून जाई. आणि बाकीच फराळ चालायचा.

' त्याचं असं आहे साहेब–' तिसरं पोरगं डोईची टोपी मागंपुढं करीत मध्ये घुसलं. विष्णु मोरबाळ्यानं नांवं सांगितलीं होतीं खरी, पण विजयच्या तीं ध्यानांत रहाणं कठिण होतं. या लोकांत नांवसुद्धां सारखींच असत. तीं लक्षांत ठेवण्याचं पण कारण नसे. तर हें तिसरं पोरगं सांगत होतं, 'एस टींत बसलं कीं, अधी नाहीं मधी नाहीं, थेट गडहिंग्लजला उतरायचं–काय ?'

'एस टी नाहींतरी चारपर्यंत गडहिंग्लजला जातेच बघा.' हा विष्णु मोरबाळे बोलला, ' स्टँडवर उतरलं कीं पेटी डोचक्यावर उचलून सरळ पायीं निघायचं. काय ? आहे, मोटारीचा रस्ता पण आहे. पण तो सोडायचा. ही पायवाट सोईची. टाइम वांचतो. काय ? आपलं वाटेला लागायचं. हे असं सारखं रपरप् चालत रहायचं. एकट्या दुकट्यानं जायची सोय नाहीं. जनावरं आहेत, बिपटा पण निघतो म्हणतात. ध्यायला, भूतंखेतंसुद्धां लई. तर सांगायचा मुद्दा, मुक्कामाला पोंचायला अर्धी रात्र ठेवलेली आणि बाकी रात्र गांववाले मग चौकशी करीत बसतात. हा कसा आहे आणि त्याचं कसं चाललं आहे...'

'तुमच्या गांवाला नांवबीव असेलच कीं कांहीं !' विजयनं पुन्हां एकदां या पोरांना वळणावर आणायचा प्रयत्न केला.

' एक का काय ? बरींच आहेत साहेब ! ' एकजण अभिमानानं डिवचून बोलला, ' राधेचा डोह, बोंबलीचा माळ–' त्यानं यादी लावली.

' बस्स बाबा ! फक्त एकच पुरे. '

तसे ते चौघेही पंचायतींत पडले. साहेबानं त्यांना पेंचांत टाकलं होतं. आतां गांवालाच जर मुळीं पांचदहा नांवं, तर एकच कसं सांगायचं. मोठाच प्रश्न होता. ते एकमेकांच्या तोंडाकडे पाहूं लागले. त्यांच्यांत विष्णु मोरबाळे जरा शहाणा. त्यानं शक्कल काढली, ' साहेब, तुम्हीच लिवा झालं एकादं. '

' होय, होय ! बरोबर साहेब. लिवा तुम्हीच. झकपैकीं.' बाकीच्यांनीं री ओढली.

असिस्टन्ट मॅनेजर खरा, पण विजयलासुद्धां हंसूं आवरेना. ' गांव तुमचं. त्याला नांव ठेवूं मी ?'

'हात्तेच्या ! त्याला काय होतं !' चौघांनीं एकमतानं कबुली दिली.

विष्णु मोरबाळे तर गळ्यांतच पडत पुटपुटला, ' नाहींतरी गांवीं मास्तरच बघायचा हें सगळं. आम्हांला तरासच पडला नाहीं कधीं. '

त्यांच्याशीं अधिक बोलण्यांत अर्थ नव्हता. उगाच वेळ मात्र फुकट गेला असता आणि बाहेर तर बरीच मोठी रांग दिसत होती. शेंशंभर लोकं लाइन लावून होती. रजिस्टरांत विजयनं कांहींतरी खरडलं आणि मग विचारलं, ' शिक्षण नसेलच—'

' शिक्शाण ? ' त्यांच्यापैकीं एकजण फाजील उत्साहानं फुलला. निदान या प्रश्नांवर तरी त्याच्याकडे बोलण्यासारखं खूप होतं.

' साहेब, आमचा हा महादेव लई बुकं झालाय् बघा. लई म्हणजे काय लईच–एकदम. '

' आणि तूं ? '

' आमचं बाकी तसलंच. म्हणजे काय ? नाहींच. आमचा हा महादेव मात्र कागद् वाचतो. तशी निकडच असली तर लिवीलसुद्धां. सहीदेखील करतां येते साहेब याला. म्हणजे तुम्हीच बघा–' दुसऱ्यानं माहिती दिली.

' होय का रे ? '

' जी. ' महादेवाचा सावळा चेहरा स्तुतीनं लख्ख उजळला. पानानं किटलेले दांत विचकून तो निसुक हंसला.

विजय चेष्टेनं म्हणाला, ' म्हणजे खरंच सही करतां येते तुला ?'

' आठ वर्सं साळंत होतो साहेब. '

' आठ वर्षं ? भलतंच. म्हणजे फायनल आहेस का काय ?'

' फायणलच काय साहेब—' महादेव शेफारून बोलला. पोराच्या अंगावर तरी मूठभर मांस चढलं होतं.

' अरे वाः !' विजयला कौतुक झालं. या निरक्षर लोकांत थोडं-फार शिकलेलं एकादं पोरगं निघावं याचं त्याला बरं वाटलं.



अनुक्रमणिका

आणि तितक्यांत महादेवानं वाक्य पूर्ण केलं, 'पुऱ्या तीन यत्ता केल्यात साहेब. म्होरं पणे जाणार होतों. पण वय झालं. अन् बानं लगिन करून दिलं--'

साहेबाला एकाएकी काय झालं महादेवाला कांहीं कळेना. बावळटासारखा तोंड उघडं टाकून तो आपला बघत राहिला. विजय खो:खो: हंसत होता. मुद्दाम नाहीं. त्याला रहावेनाच...

या अशा गंमती आजकाल त्याला रोजच्या झाल्या होत्या. गेले चार महिने कंपनीत भरती चालू होती. कंपनीचा हा असिस्टन्ट मॅनेजर लोकांची भरती करीत होता खाणीवर कामासाठीं लोकं कुठून कुठून धांवून येत होती. पंधरा-सोळा वर्षांच्या अर्धवट पोरांपासून साठींत लटपटणाऱ्या म्हाताऱ्यापर्यंत कुणीही बेकार घरला बसून कंटाळला कीं निघाला पांच-पन्नास मैल पायपीट करीत. डोंगरावर पांढऱ्या पत्र्याच्या या मोठ्या शेडीसमोर नंबर लावून लायनींत तो ताटकळत उभा राही. त्याला नांव-गांव, शिक्षण-अनुभव-कांहीं कांहीं नसलं तरी बिघडत नव्हतं. तें काय तें असिस्टन्ट मॅनेजर बघून घेई. हें काम त्याचं होतं आणि कंपनीला माणसांची गरज होती. खाणीवर नेमावीं तितकीं लोकं कमीच पडत. कुठच्या कुठं गडप होऊन जात—

विजय मोठमोठ्यानं हंसूं लागलेला बघून बाकीच्या तिन्ही पोरांना वाटलं, साहेबाला शंका आहे. आपला महादेव इतका शिकलेला असेल ही गोष्ट त्याला खरी वाटत नाहीं. बरोबरच होतं. काय किरकोळ बात होती तर सांगून एकदम लोकांचा विश्वास बसेल! गांवाकडे तरी काय कमी संशय घेतला होता. कोणी कोणी! तरी बरं महादेवाला हा अंदाज होताच. आणि म्हणून मास्तराकडून त्यानं तें सर्टिफिकेट लिहून घेतलं होतं. तें दाखवलं कीं लोकं मग मुकाट बसत. बोलणार काय? मास्तरानं काय लिहायचं तें सगळं चोख लिहून टाकलं होतं ह्या कागदांत. फक्त नजर टाकायची खोटी कीं आवाज बंद झालाच!

'खोटं नाहीं साहेब. आमचा हा महादेव लई शिकलाय बघा. तसं मास्तरांचं सर्टिफिकेटच आहे त्याच्यापाशीं. काय?' बाकीच्यांनीं ग्वाही दिली, 'महादेवा, बघत काय राहिलास. साहेबांना तुझं तें सर्टिफिकिट दाव.'

'होय कीं! हिची भैण-' महादेव एकदम भानावर येऊन पुटपुटला. आधीं खमिसाच्या आणि मग पाटलोणीच्या खिशांत त्यानं हात घातला. सर्टिफिकेट सांपडेना, तसा त्याचा चेहरा पडला. तो कावराबावरा झाला. डोक्याची टोपी काढून त्यानं आंतील पट्टी तपासली. संवयीनं कनवटा चांचपल्या. कपाळाला हात लावला आणि अखेर देवाचं नांव घेऊन पानांची चंची साहेबाच्या टेबलावर उघडी केली. तमाखूच्या पुडीसारखीच वेडीवाकडी घडी केलेलं तें सर्टिफिकेट दिसतांच महादेवाला कोण आनंद झाला.

शंभराची नोट मिळती तरी इतका हर्ष झाला नसता त्याला. उचंबळून तो म्हणाला, 'हें सर्टिफिकिट साहेब.'

ते सर्टिफिकेट बघून खुशालीच्या मात्र पोटांत दुखलं. दांत ओठ खात तो पुटपुटला, 'अण्णागुरुजींच्या शाळेंत चौथीपर्यंत चढलों आणि तरीहि आम्ही प्रायमरीच राहिलों. तीन यत्ता नाहीं झाल्यांत आन् हा मात्र फायनलपेक्षां मोठा काय! भांचोद, काय लपेटतोस रे घाट्या नाहीं तें एकएक! आं! हिथं कंपनीत आम्ही काय हजाम बसलोंत होय? तर विश्वास ठेवणार—'

महादेवाच्या मास्तराचीं अक्षरं विजय मोठ्या कष्टानं लावीत होता. त्यानं एकदम म्हटलं, "अरे मग हें आधीं नाहीं दाखवायचं?'

'तुम्ही मागितलंच नाही, साहेब.' विष्णु मोरबाळ्यानं रोकडा जाब दिला.

'कपाळ तुमचं! आतां मी नाही रजिस्टरांत खोडाखोड करीत.' तुमचीं खरीं नांव काय असतील तीं असोत कंपनीच्या रजिस्टरांत मात्र तुम्ही सगळी मोरबाळचं रहाणार. आणि तुमच्या गांवाचं नांव राधेचा डोह. राहिलं तर इतकंच ध्यानांत ठेवा. विसरलांत तर उत्तमच. विजयनं हंसून सांगितलं, 'पांढरीच्या महादेव शिपूरकराचं हें सर्टिफिकिट चंचींतच राहूं दे. तंबाकू बांधायला उपयोगी पडेल...उद्यां रविवार. कंपनीला सुट्टी. परवां इथं हापिसांत येऊन कार्ड घेऊन जा... आणि कामावर रुजू व्हा. काय? हें मात्र ध्यानांत ठेवा.'

'जी साहेब! लई उपकार- काय?' पोरं खुश झालीं. त्यांचं काम बिनबोभाट झालं होतं. कसलीच पंचाईत आली नाहीं. साहेब स्वभावाचाच भला. ओरडत नाहीं, रागवत नाही. काम सांगाल तें आपलं ऐकून घेतो. आणि आपला हंसत सुटतो. लई चांगला माणूस. तसाच गमत्या...वांकवांकून विजयला तीं मुजरा करीत राहिलीं. 'लई उपकार साहेब, लई उपकार—'

त्याचा ग्रुस्सा आला खुशालीला. निष्कारण तो उखडला. जळफळत तो ओरडला, 'निघा कीं आतां कां घालू पेंकटांत लाथ? जळवा नुसत्या—'

एकाच्या तें लक्षांत आलं. तो कुजबुजला, 'चला रे, निघूं आतां. मुकादम ओरडतात—'

'गेलांत खड्ड्यांत. घाट्यांवर ओरडायला गाढव नाहीं मी. अरे ढोरं तुम्हीं. कांठीनं हांवलावी तेव्हांच हलणार-' खुशालीनं तोंड सोडलं. तसा चारही पोरांनी पळ काढला.

म्हणजे यांतसुद्धां नवीन कांहीं नव्हतं. रोजचाच प्रकार होता तो. विजयला वेळेचं भान उरत नसे. ह्या असल्या फालतू लोकांबरोबर सुद्धां कितीहि वेळ तो बोलत बसे. आणि बाहेर मग रांग वाढत जाई. काळोख झाला तरी ती संपत नसे. खुशालीच्या कोंकणी मनाला हें पटत नसे. कायद्यानं कंपनीचं हापीस पांचला बंद व्हायचं. फक्त त्यालाच घरीं परतायला रात्र होई. आणि हा अन्याय होता. त्याला तो बिलकूल नापसंत होता.

त्याचा जळफळाट सुरु होई. साहेबाला तर बोलतां येत नव्हतंच. आपला राग परगांवच्या या गांवढळ पाव्हण्यांवर तो असा काढून घेई.

घाटी पोरं साहेबाच्या खोलींतून बाहेर पडलीं तरी पण खुशालीची बडबड चाललीच होती, "माणसांचं पेंव फुटलं आहे म्हणतात तिकडे घाटावर. गांवोगांव किड्यांसारखीं खुदखुदतायत् लोकं—'

'बरं बरं!' विजयनं त्याला थंड करण्याचा प्रयत्न केला. गांवांत या विषयावर आजकाल बरीच चर्चा चाले. कंपनीच्या हापिसांत ती कटकट नको होती.

पण एकदां जोरांत आला कीं खुशाली असा सुखासुखी गप्प होणाऱ्यांपैकी नव्हता. 'बरं कशाचं साहेब? वाईट गोष्ट. लोंढा लागलाय् घाट्यांचा आपल्या गांवाकडे. मुळचं गांवच खलास व्हायचा टायम आलाय्. एसट्या भरभरून खाली होतायत शिरोड्याला. आणि मग तिथून जी लायन लागते ती थेट हिथंपर्यंत-कंपनीच्या दारांत.'

अनुक्रमणिका






विजयनं हंसून म्हटलं, 'अरे यांत वाईट काय झालं. कंपनीला माणसं मिळताहेत. म्हणून खाणी चालल्यात. आणि म्हणून लेका आपल्या नोकऱ्या टिकून आहेत.'

साहेब, पण ह्या गांवचं कसं ? पुढं काय होणार आहे ' खुशालीचे नसते प्रश्न.

' छान, उत्तम होणार. कधीं नव्हते इतके चांगले दिवस आलेत गांवाला. सध्यां सुवर्णयुग चालू आहे बेटा– आहेस कुठं ! घरबसल्या मोफत पैसा येतोय. रेग्युलर–दर रविवारला. तुझ्या गांवच्या लोकांना नाहीतरी तोच हवा असतो. कामाची त्यांना आवड नाहीं. घामाचा पैसा महाग वाटतो. पोरांच्या मनीआर्डरी येताहेत मुंबईहून. त्यांत ही आयती भर. रातला डोकं टेकायला काय चार्ज घेतां रे तुम्ही ? ओसरीवर, मांगरांत, खळ्यांतसुद्धां. दरडोई आठवड्याला आठ आणे. भलताच. चैन चालली आहे. लेको तुमची—'

' तुम्ही पण चेष्टा करा साहेब ! वैतागानं खुशाली उसळलां आणि दारांतून तोंड बाहेर काढून ओरडला, ' पुढला नंबर–चल हो आंत–'

तेव्हढ्यांत बाजूला रस्त्यावरून धुळीचे लोट उडवीत एक जीप भर वेगांत आली. जोरजोरानं हॉर्न वाजवीत. आणि रांगेंतील लोकांचीं सर्रास पांगापांग करीत हापिसच्या दारांत येऊन ती खडी ठाकली. बसल्या जागेवरून जीपमधून कुणीसं गुर्मीत ओरडलं, ' अरे शिर्केसाहेब, शेटचा निरोप आहे. '

' शेट आले ?' खुशालीनं सहज विचारलं. आणि मग त्याच्या लक्षांत आलं कीं चुकलं आपलं. नसता अगाऊपणा झाला आतां भरलीच.

म्हणजे जीपमधल्या या माणसाला तो ओळखत होता. रामप्पा शेट्टी म्हणजे कंपनींत एक जबर प्रस्थ झालं होतं. वेताळासारखा धिप्पाड आणि रेड्यासारखा ठार काळा होता रामप्पा. त्याची गर्दन होती गेंड्याची आणि ताकदही तशीच अचाट. मुंबईचा हा तडीपार दादा तूर्त कंपनींत आश्रयाला आला होता. कसा न् काय एक मुंबईच्या मालकांना माहीत आणि दुसरं मॅनेजर राजाभाऊ गोळ्याला. रामप्पा शेट्टीच्या पराक्रमाच्या एक एक वदंता मात्र गांवांत तूर्त खूप गाजत होत्या. विशेष म्हणजे त्यानं एक डझन खून पचवले होते. आणि कैक लोकांना ठीक केलें होतें.

' कोण पुछता है रे तो ?' रामप्पानं दरडावलं.

' जी साहेब ! खुशाली मी.'

त्याच्या उत्तरांतील साहेब या शब्दानं बरंच काम केलं. आणि म्हणूनच तो वाचला. रामप्पा भलताच विरघळला. तबियत निहायत खुश झाली त्याची. त्यानं म्हटलं, ' छोकरा, तुझ्या शिर्क्याला जागा कर. शेटचा अर्जंट निरोप आहे. काय ?'

आणि रामप्पा जोरजोरानं. हॉर्न वाजवीत राहिला.

विजयनं पुढं येऊन जरा रागानंच विचारलं, ' काय आहे ? '

' बोंब. ' आणि मुंबईचा तो दादा गदगदून हंसला, ' शेटचा निरोप. '

' ते आले ? '

' अरे क्या पुछता है ? आले म्हणजे ! येणारच. काय अकेले येऊं आम्ही ? साला ए. डी. शी. आम्ही त्यांचे. ' आपल्या अवाढव्य देहांकडे अभिमानानं बघत रामप्पा म्हणाला. आणि वर पुन्हा विकटपणें हंसला.












तिकड दुर्लक्ष करीत विजयनं थंडपणं विचारलं, ' काय निरोप आहे ? '

'एकदम शिक्रेट. कुठं कोणाच्या कानावर गेला कीं निकाल !'

' माझ्या कानावर तरी घालणार आहांत—कीं नाहीं ? '

' वाः ! मस्करी करतां का काय राव ? तुमच्या ठिकाणीं कोणी और होता तर जबान काटली असती. ' रामप्पा उखाडला. आणि तसा दादागिरीच्या भाषेंत बोलूं लागला.

' तेव्हढा निरोप बोला. लोकं उभीं आहेत रांगेंत. ' हा असिस्टंट मॅनेजर विजय शिर्के बोलत होता.

आणि तो हुकमी वर रामप्पाला बरोबर समजला असावा. उगाच नाही त्याच्या डोळ्यांतील बेछुट मग्रुरी मावळली. चेहऱ्यावरचा बेदरकार नूर कमी झाला. आणि गोळेसाहेबाचा निरोप विजयला त्यानं सांगितला तो देखील खूप खालच्या आवाजांत.

जिल्हा विकासमंडळाच्या बैठकीला जातीनं उपस्थित रहण्यासाठीं गोळेसाहेब गेले आठ दिवस रत्नागिरीला मुक्काम ठोकून होता. त्यानं खूप धांवपळ केली. जाम लटपटी अन् खटपटी केल्या. कांहीं उपयोग झाला नाहीं. शिकस्त करूनसुद्धां कंपनीचं प्रकरण अखेर चर्चेसाठीं बैठकींत आलंच. भलतंच रंगलं. या बाबतींत सरकारी धोरण काय असावं याचासुद्धां खूप उहापोह झाला. कंपनीच्या कारभारावर तर सडकून टीका झाली. कंपनी मॅनेजरचं म्हणणं कोणी ऐकून घ्यायला तंयार नव्हतं. त्याला मुळी बोलूंच दिलं नाहीं. तोंड दाबून बुक्क्यांचा मार अशी अवस्था केली. जिल्हा विकासमंडळाच्या या बैठकींत निश्चित काय निर्णय घेण्यांत आले तें रामप्पा शेट्टीला बरोबर ठाऊक नव्हतं. पण ते कांहीं असलें तरी गोळेसाहेबाला बिलकुल नापसंत होते एव्हढं बाकी नक्की. कारण शेटचं ब्लडप्रेशर वाढलं होतं. गोरा, गरगरीत चेहरा साफ काळा ठिक्कर पडला होता. दाजी नाबराच्या नांवानं तो बोंब मारीत सुटला होता. गांवाला चांगलाच धडा शिकवण्याची प्रतिज्ञा करीतच कंपनीचा मॅनेजर गांवी परतला होता.

हें सगळं साग्रसंगीत भाषेत सांगून रामप्पानं म्हटलं, ' तो कोण म्हातारा अन्ना का फन्ना—'

' मामा ते माझे. ' विजयनं माहिती दिली.

' आत्ता मला हो काय माहीत ? तर ह्या बुड्ढ्याला साथ घेऊन शेटनं तुम्हाला अर्जन्ट पुकारलंय— काय ? '

' शेट कुठंयत ? '

' दुसरीकडे कुठं असणार ? तिकडेच कीं—' रामप्पा डोळा घालून मोठ्यानं हंसला, ' म्हणजे आपल्या त्या रांडेकडेच—माझा पण बेत होता. तर शेट बोलले निरोप अर्जन्ट—'

' अण्णागुरुजी अशात घरीं येतीलसं वाटत नाहीं. '

' च्यायला ! येडाच दिसतो. अरे चारपांच मस्त पोरी ठेवल्यांत रांडेनं दिमतीला. विलायती दारूपण मिळते. कुठून आणते देवजाणे ! पैसा बाकी जाम काढते— तर बुड्ढ्याला मी करतों ठीक. रावणानं शितेला खांद्यावर उचलली अश्शी तसा घेऊन जातों...काय ? '

' यू रास्कल—' विजय उसळला.

' तुमचा मामा नव्हेतो— विसरतोंच बघा. '

' शेटना म्हणावं तुमचा निरोप कळावतों मी—' विजय कडवटपणं म्हणाला.

' उपकार नाहीं करत—' असं कायसंसं गुरगुरत रामप्पा शेट्टीनं जीप चालू केली. बाजुला ताटकळत उभ्या असलेल्या लोकांच्या रांगेंत बेपर्वाईनं ती घुसवली. लोकांचा ओरडा, गील्ला, पांगापांग—धुळीचे लोट उडवीत जीप बेफाम रस्त्याला लागली.

## १४

**विजयचा** तर्क तपशील चुकला होता. त्याला वाटलं होतं, निरोप ऐकून मामाच्या अंगांत दुर्वास संचरणार. आपल्याला नाही नाहीं तें ऐकावं लागणार. गोळेसाहेब सोडाच, पण प्रत्यक्ष देवानं देखील आपल्या ठेवलेल्या बाईच्या घरीं म्हाताऱ्याला भेटायला बोलावलं असतं तरी काठी उगारून तो अंगावर धांवला असता. गप्प नसता राहिला म्हणजे हा अपमान होता. यांत अण्णागुरुजीची किंमत कमी होत होती. लौकिकाला बाध येत होता. आणि त्यानं बाकी कांहीही सहन केलं असतं— पण हा असला अपमान नाहीं.

गोळेसाहेबाचा निरोप विजयनं मामाच्या कानावर घातला आणि आतां स्फोट कधीं होतो याची वाट बघत तो उभा राहिला.

पण त्याचा अंदाज घसरला होता. स्फोट झालाच नाहीं. त्याचा मामा थंडच होता— बिलकुल थंड ! बिनकेसाच्या त्या भुंवया वर चढल्या नाहींत. डोळ्यांच्या बुबुळांत ठिणगी पडली नाहीं. आवेशानं उसळून अण्णागुरुजीनं हात झाडले नाहींत कीं तारस्वरांत कंपनीच्या मॅनेजराचा आईबाप काढला नाहीं. उलट हंसत हंसत म्हातारा मिस्किलपणानं म्हणाला, ' अरे, या अण्णाला बोलावणारच. '

राजाभाऊ गोळें बोलावणं धाडणार हें अण्णागुरुजीला अपेक्षितच असावं. निरोपाची तो वाटच बघत बसला होता. म्हातारा एकुण तसा तयारींतच होता. निरोप ऐकला आणि बाहेर कोपऱ्यांत टेकून ठेवलेली काठी त्यानं हातांत घेतली. वहाणा घातल्या. काठी टेकत घाईनं तो निघाला.

पायऱ्या उतरत मागं विजयला तो म्हणाला, ' फुकट उशीर झाला तर तुझा तो मॅनेजर स्वतः धांवत यायचा हिथवर. त्याला आणीक कशाला तसदी द्या ? आं ?'

' पण इतकी काय घाई आहे मामा ? ' विजयला खरंच आश्चर्य झालं. म्हणजे नक्की काय बोलावं हें न कळण्याइतपत.

त्याच्या मानानं. नंदीबैलासारखी मान हालवली. सांगितलं, '

'आहे, घाईच आहे बेटा. '

' म्हणजे ? '

' आत्तांच नाहीं सांगत. कळेलच उद्यांपर्यंत. '

' काय ? '

' अरे विजय, ज्या क्षणाची तुझा हा म्हातारा मामा आयुष्यभर वाट बघत होता तो आला रे—आला पोरा. '

बेटा भाचा आणखीनच गोंधळला. या विचित्र बोलण्यानं तो मुळीं कोड्यांतच पडला. ' पण असं काय झालंय् मामा ? '

' झालंय बरोबर. होणार सुद्धां अगदी बरोबरच. नको काळजी तुला. अण्णागुरुजी शर्यत जिंकणार—जिंकणारच आतां '

म्हातारा काय बरळत होता त्याचं त्याला ठाऊक. किंवा त्यालाही ठाऊक नसावं. कारण विचार करून तो बोलला नव्हताच. विचार करून बोलण्याच्या तो मुळीं मनस्थितींत नव्हता. कांही वेगळ्याच धुंदींत होता, भ्रमांत होता.

म्हणूनच त्यानं विजयला आपल्याबरोबर गोळेसाहेबाकडे

... पान ५४ वर








*आस्ट्रेलियाचे सुप्रसिद्ध चित्रकार श्री. जॉर्ज मोल्नार यांची जुलै अंकापासून सुरू झालेली व रसिक वाचकांना आवडत असलेली...*

हींच तीं व्यंगचित्रात्मक



अनुवादक : दि. श्री. काउकर

### लिस्बन :

स. न. वि. वि.

पोर्तुगीजांनीं पहिल्यांदा अमेरिका शोधून काढली. नंतर ऑस्ट्रेलिया खंड शोधून काढला. ह्यामुळें शेफारून जाऊन ते आणखी शोध करायला निघाले पण स्वतःच्या देशांतच एक झक्क बंदर शोधून काढण्यापलीकडे त्यांनीं कांहींही संशोधन केलं नाहीं.

'At Home' चा अर्थ पोर्तुगीज बायका घरांत रहाणें असा करतात व पोर्तुगीज पुरुष ह्याचा अर्थ हॉटेलांत बसून जगाकडे पाहणें असा करतात.

पोर्तुगालची हवा प्रसन्न आहे. इथलें प्रमुख अन्नपदार्थ समुद्रांतले असतात. लोण्याला स्वतःचें सौंदर्य असते. आणि सुंदर...सुंदर... कितीतरी सुंदर...दारू असते. दारु हातभट्टीची नसूनही स्वस्त आणि भरपूर. हॉटेलांत आपल्याकडे जसें पाण्याचे ग्लास ठेवतात त्या



पॅरीस

विपुलतेनें इथल्या हॉटेलांतील टेबलांवर दारूच्या बाटल्या ठेवलेल्या असतात. ह्या बाटल्यांच्या ओझ्यानें टेबल कण्हतकुथत असते.

पांढऱ्या शुभ्र आच्छादनावर अनेक काळे ठिपके उडालेलें दिसतात. लांबून दारूचे वाटावेत पण जवळ जाऊन पहावं तर त्या माशा असतात. इथें माशाही भरपूर. खूप दिवसांनीं ही अस्सल अवलाद पहायला मिळाली म्हणून घरचं माणूस भेटल्यासारखा आनंद झाला.

प्रवाशांना इथें फार भाव आहे.

### लंडन :

स. न. वि. वि.

इथें हॅट डोक्यावर नसेल तर आपण नागडं फिरतोय असा विनाकारण भास होतो.

माझी हॅट मात्र मी सामानाच्या अडगळींत टाकली होती. ती शोधून डोक्यावर घालण्यापेक्षां मी नागडं फिरण्याचं पसंत केलं.

लंडन उन्हांत ऊब घेत बसलंय. इथल्या हिरवेपणापुढें हिरवा रंगही फिका पडावा. बागा तुळतुळीत दाढी केल्याप्रमाणें वाटतात. दगडांचे नक्षीदार कठडे शुभ्र रंगानें निथळून निघाले आहेत. इथें सगळे 'ब्लॅक सुटस्' घालून वावरतात त्यामुळें सावल्यांनीं जणूंकाय शरीरभर काजळ कोरलंय असं वाटतं. प्रत्येक इमारतीला परंपरा आणि इतिहास आहे; आणि पांचशें वर्षांपूर्वी घडलेली घटना कालच घडली आहे इतकी इथें चिरंतनत्वाची शाश्वत कल्पना.

लाल लाल दुमजली बसगाड्या डुलत डुलत स्वच्छंदानें वागडत असतात.

इंग्लिश माणूस सुखी आहे. मुख्य म्हणजे समाधानी आहे. सुएझचा प्रश्न त्याला महत्वाचा वाटत नाहीं. त्याला महत्व वाटते हवामानाचे, हवा स्वच्छ आहे. छत्री बंद करायला हरकत नाहीं आणि शेवटचा कसोटी सामना मर्दुमकी गाजवूनही अनिर्णीत राहिला कीं !

आतां सगळं कसं पुन्हां व्यवस्थित आहे.

इंग्लिश-माणसाला तीन गोष्टींचं विलक्षण कौतुक. त्यांतही तो क्रमवारीला महत्व देतो. क्रमवारीनें त्या अशा—मुक्या जनावरांना दया दाखविणें, खेळांत खिलाडूवृत्ती प्रदर्शित करणें आणि तिसरी विनोदबुद्धि असणें. (ह्या तीन गोष्टी तुमच्याजवळ असतील तर तावडतोब लंडनला भेट द्या.)

इथें तीनच गोष्टींचीं प्रदर्शनें भरतात—फुलं, कुत्रीं आणि घोडे. वर्षांतून एकदां भरणाऱ्या Royal Academy च्या प्रदर्शनाचा तेवढा अपवाद.

### पॅरीस :

स. न. वि. वि.

शुभ्र पुतळे सूर्य किरणांनीं जबरदस्तपणें होरपळून निघत आहेत; आणि सिंह दयावंत होऊन तुमच्यासमोर तोऱ्यांत उभे आहेत. वृक्षांखालीं लहान मुलें व बकऱ्या बागडतायत. आकाश अवाढव्य पसरलंय आणि ढगं सुद्धां 'कॅज्युअल' मारून रुबाबांत विश्रांती घेत आहेत जणूं.

'बोझू आर्टस्' (Beaux Arts) मधील आर्कीटेक्टचे विद्यार्थी रात्रीं वीणा, बांसरी, अल्गुज वगैरेतून न शोभणारा आवाज काढतात म्हणून त्यांना तेथून हुसकावून देण्यांत येत आहे.

स्वतःला आलेल्या 'चेक्स्'चा खरेखोटेपणा पडताळण्यासाठीं एका वकिलानें एका गाढवाला (खऱ्या!) हे चेक घेऊन बँकेंत पाठविलं.

हें संबंध शहर विकारवश होऊन आक्रोश करतंय जणुं. टापटीप राहणीचं हें शहर आहे.

पॅरीस



नदींतून निसर्ग शोभा बघण्यासाठीं इथें खास लहान लहान बोटी आहेत. ह्या बोटींमध्यें खाण्यापिण्याची सोय आहे. दोघांसाठींच (ती आणि तो!) खाद्य पदार्थांच्या बशा राहतील इतकीं 'ऐसपैस' टेबलं आहेत. निसर्ग शोभा पाहतां पाहतां तुम्हीं बकाणा भरूं शकता (आणि भरवूंही शकतां). पाणी काळे-निळे आहे व आरशासारखें दिसतें.

हिऱ्यांनीं मढविले एक झारी एका जवाहिऱ्याच्या 'शो-केस-मध्यें ठेवलेली पाहिली. तिची किंमत तेरा लाख रुपये आहे. शेजारी 'लेबल' होतं-'Sold.'

स्त्रियांचे चेहरे उबट व खडबडीत आहेत तरीही इथें स्त्रियांसाठींच प्रवासी येतात.

हें पॅरीस आहे. जगांतील एक सुंदर शहर आहे.

## म्युंनिच

स. न. वि. वि.

म्युनिचमध्यें दारू आहे. शांतता आहे आणि चेंबरलीनची छत्रीही आंहे.

म्युनिचमध्यें हिटलरही होता. आणि हेच भयंकर होतं. शहर कसंबसं वाचलं.

हिटलरची ह्या शहरावर 'लई माया.' आपल्या प्रेमाचं प्रतिक म्हणून त्यानें इथें आवाढव्य इमारती बांधल्या-विश्वास न बसावा इतक्या कुरूप. एक त्याच्या स्वतःसाठीं, एक पार्टीसाठीं आणि एक मित्रमंडळीसाठीं-मुसोलिनीसारख.

युद्धकाळांत म्युनिचरवर फार मोठा बॉंब-वर्षाव झाला. त्यामुळें ओबडधोबड व कळकट दिसणाऱ्या पुष्कळ इमारतींना सौंदर्य प्राप्त झालं. एकंदरींत 'रोमँटीक' शेवट ह्या इमारतींना लाभला. बॉंब-वर्षावा-मुळें रहदारीचा व 'पार्कींग'चा प्रश्नही सुटला. अगदीं मनापासून सांगतो.-शहर सुधारणेच्या दृष्टीनें बॉम्ब-वर्षावानें अजोड अशी कामगिरी बजावली आहे.

इथें दारूच्या अड्ड्यांसाठीं भव्य दिवाणखाने आहेत. ह्या दिवाणखान्यांसाठीं म्युनिच प्रसिद्ध आहे. शिवाय चित्रकार रुबेनने काढलेल्या सगळ्या नग्न (भव्य) स्त्रियांचा संग्रह म्युनिच जतन करून आहे.

दारू पीत पीत ह्याच दिवाणखान्यांतून नाझी पार्टीनें आपले कट रचले. दिवाणखान्याचा करण्यांत आलेला हा सगळ्यांत मोठा दुरुपयोग.

म्युनिचच्या नागरीकांना प्रशियन समजणं चुकीचं आहे. म्युनिचचे नागरीक कलासक्त, शांतताप्रिय आणि विनोदबुद्धी असलेले आहेत. आतां हिटलर एक ह्मो विनोद होता हें सोडून द्यां. ●●●

*क्षणांतच तिला कुणी तरी*
*मागे खेंचलं. तिच्या मानेला उष्ण श्वासाचा*
*स्पर्श झाला. आणि मग......*



**अमाने** आवड्याला हांकावर हांका मारल्या पण देवतळ्यांत ओवळीणीच्या छायेखालील भली थोरली फातर निवडून कपडे धूत असलेल्या आवड्याला एकही हांक ऐकूं आली नाहीं. ती आपली टोपलींतून आणलेलीं चिरगुटें जोरजोरानें फातरीवर कधीं आपटीत होती तर कधीं खसखसून चोळीत होती. तिचे गुडघ्यापर्यंत पाय पाण्यांत बुडाले होते. तिचा अस्कळविस्कळ केसांचा अंबाडा तिच्या मानेवर मागच्या बाजूनें सैलपणानें सारखा घसरत होता व घासत पण होता. तिची लांबसडक बेढब उंच शरीरयष्टि कधीं ओंगळवाणेपणें खाली होत होती; तर कधीं वर होत होती. तिचे जाड वाकडे ओठ अधिकच वाकडें होत होते. तिच्या मूळच्या तिरळ्या बटबटींत नजरेला ती पाण्यांत आणि टोपलींत रोखून धरायची आणि खांद्यावरून सारखा सारखा घरंगळणारा आपल्या आडव्या बोंदराचा आंखूड पदर ती कधीं तसाच राहूं द्यायची; नाहींतर वेंधळेपणानें दूर करायची. तिचं आकुंचित कपाळ, बसकं नाक, चिंचोळी चेपटी हनुवटी आणि काळ्या कुळकुळीत केसांचा विपुल संभार, तिच्या लंबूस काटकुळ्या मानेवर लटपटीतपणें सांवरला जायचा. आवडा दुपारची तळ्याकडे फिरकायची तेव्हां तळ्याच्या ओवळीमुळच्या फातरीवर बहुतेक बायकांची धुणी न्हाणी उरकून झालेली असायची. दुपारचा भर ओसरलेला असायचा. देऊळ अवाठांत सामसूम झालेली असे. लोकांची जेवणं होऊन भुकेचा प्रश्न मिटलेला असे. देवळांत आंत–बाहेर फारसं कुणी फिरकत नसे. शंकराच्या देवळाच्या मागच्या बाजूलाच गडग्यांतून जातांना उजव्या हाताला बंडू गुरवाचं घर व परडं होतं आणि मधली पाणंद टाकून डाव्या बाजूलाच अमाचं घर होतं. देवालयाच्या तटाला कांहींसं भिडलेले. तिथूनच मागे मागे वाड्यांच्या व्हाळापर्यंत देऊळवाडा पसरलेला होता. अमा ही एक देवाची भावीण होती आणि घाड्यांच्या व्हाळापासून तो आमरस्त्यावरील पिंपळाच्या पारापर्यंतची व देवतळ्याच्या काठांवरची सर्वच तांबड्या रंगाचीं घरें भाविणींची होतीं. अमाच्या घराकडून देवळाकडे येणारी पायवाट देवालयाच्या मागील दारीं यायची; पिंपळपाराकडून येणारी वाट दक्षिणेकडून नगारखान्याला येऊन भिडायची; तळ्याच्या काठाकाठानें



—प्रभाकर नेरुरकर

येणारी ती वाट होती. येतांना उजव्या बाजूला दोन–चार दशावतारी देवळ्यांचीं घरें तर डाव्या बाजूला रवळनाथ, सातेरी, भैरव यासारख्या उपदैवतांचीं छोटीं छोटीं देवळें बसकीं, उभीं होती. अमा आपल्या खळ्यांत उभी राहून, दोन्ही हात कमरेवर घेऊन किंचाळत आवड्याला साद घालीत होती...

‘ गो आवड्या ऽ ऽ... ’

‘ आवड्या ऽ ऽ गो ऽ ऽ... ’

आणि देवतळ्याच्या परिसरांत ती हांक दुपारची भकासपणें घुमघुमत असूनही आवड्याच्या कानावर येऊन मात्र आदळत नव्हती.

असं हें नेहमीचंच होतं. अमा आवड्याच्या नांवानें वेळीअवेळीं अशीच किंचाळत राही. अवाठांतील रहिवाशांना अमाच्या या सवयीचीच इतकी सवय झाली होती कीं तिनें दिवसभरांत आवड्याच्या नांवानें ओरड केली नाहीं तर लोक अमाच्या चौकशीला येत आणि खरंच असे तें! अमा कधीं बिछान्याला खिळलीच, नाहींतर कुठें बाहेरगांवीं गेली म्हणजे केवढी तरी मोठी पोकळी हवेंत निर्माण होई. अवाठावर अवकळा येई. इतर घरांघरांतून सुद्धां अशीच मुलाबाळांच्या नांवानें हांकाहांक होई. पण त्यांचा पल्ला मर्यादित असे. हांक आली कीं ती ऐकली जाई. तिला प्रतिसाद मिळे; मामला तिथेंच मिटे. पण अमाची आणि आवड्याची गोष्ट अगदींच वेगळी होती. अमानं आवड्याला कितीही हांका मारल्या, आणि आवडा तळ्यावरच काय पण मागील दारच्या गुरवांच्या परड्यांत असली तरी तिनें त्या ढीम ऐकूं नयेत, असं आपलं न चुकतां घडे. पुनः पुनः घडतच राही. कंटाळून कंटाळून अमा केव्हांतरी मग आपलं किंचाळणं बंद करून घेई. दोनचार दळभद्र्या कोंकणी शिव्या चरफडून घाली व आवड्याचा व स्वतःचा पण बरोबरच उद्धार करून घेई.

आवडा आपली तरीसुद्धां तळ्यावर चिरगुटें धुण्यांतच एक प्रकारें धुंद होऊन जाई. तिच्या भोंवताली, सभोंवार व दूरपर्यंत तिनेंच आपटलेल्या कपड्यांचा ध्वनि–प्रतिध्वनि उमटत राही. पाण्यांत तिच्या उघड्या पोटर्‍यांना आंतून चोरट्येपें भटके मासे सारखे चावा घेत. आतां तेही सहन करण्याची तिला संवय झाली होती. पण अगदींच कंटाळली कीं ती आपला एक पाय पाण्या बाहेर काढून फातरीच्या कडेला घट्ट रोवून ठेवी; मग पहिला पाण्यांत मोडून दुसरा वर घेई. त्यामुळें पाण्याचा जो चुबुक चुबुक ध्वनि उमटे व तळ्याच्या पृष्ठभागावर वर्तुळांतून वर्तुळें वळवळत पाण्याची हालचाल होऊं लागे. तेवढीच शांततेची जी काय मोडतोड होई तीच! झाडाझुडपावर सुद्धां पक्षीगण चिडीचूप बसलेला असे. देवतळ्याच्या बांधावरून एक पायवाट देवळाकडे जाई. त्या बांधाच्या पलिकडे हिरवीगार लांबच लांब शेतवाडी पसरलेली होती. उलट्या बाजूनें तीच वाट चव्हाट्यापर्यंत गेली होती... चव्हाट्यावर गावाची छोटीशी बाजारपेठ होती. तिथें दोन–तीन चहाची व गावठी मिठाईची हॉटेलें होतीं. दोन–तीन भुसारी दुकानें होतीं. मराठी मुलांची शाळा होती. एस्. टी. गाडीचा तळ होता. पिंपळपार होता. मारुतीचं मोडकळीला आलेलं जुनंपुराणं देऊळ होतं...आणखी पण खूप कांहीं कांहीं होतं...‘ टेलरिंग शॉप ’ होतं, पोस्टाची कचेरी होती. चांभारांचीं खोपटी होतीं. गाबतीणी मासे घेऊन तिथेंच आम रस्त्याच्या कडेकडेना बसत... संध्याकाळीं चव्हाट्यावर लोकांची ये–जा सुरू होई. वर्दळ वाढे. चव्हाट्यावरचं काम आटोपून माणसं देवतळ्याच्या बांधावरून शंकराच्या देवळांत जात. घंटा घणघणें...मग देऊळ अवाठादेखील कामाला लागे. मग तळ्यांत कुणी फातरीवर धुणीं धुतांना क्वचितच दृष्टीला पडे. पण हें सारं घडे तें दुपार उलटल्यानंतर... दुपारचं सहसा कुणी चव्हाट्यावर फिरकत नसे. आवडाच काय ती एकटी तळ्यावर वाकवाकून आणि कधीं थांबून थबकून टोपलींतील चिरगुटें फातरीवर आपटीत होती व आपटलेली पाण्यांत विसळून व पिळून पुनः टोपलींत टाकीत होती. कधीं धुतलेली सुद्धां परत धुतली जात आणि तिचं धुणं चालूंच राही...

आवडा परवा परवापर्यंत परकरी पोर होती. परकरांत तर ती अधिक विचित्र दिसे. यौवनानें तों सरसरली व मुसमुसली तरी कधीं तिचं यौवन बेढबपणानें कपड्यांबाहेर उतू गेल्यासारखं वाटे तर कधीं तिचे कपडे यौवनाला वांकुल्या दावीत वेंधळेपणानें तिच्या देहावर फक्त चिकटून रहात. तिच्या कोणत्याच अवयवांत कोणतं साम्य नव्हतं; रेखीवपणा नव्हता; डौलदारपणा तर मुळीच नव्हता. एक तंगडी एका बाजूला फांकलेली, फेंगडी; तर दुसरी दुसऱ्या बाजूला. त्यामुळें ती चालतांना दोन्ही पायांनीं लंगडी घातल्यासारखी चाले. तिच्या हातांतील बेढबपणा पण तसाच ओंगळवाणा होता. तिचा एक हात दुसऱ्या हातापेक्षां आंखुडलेला वाटे व तिच्या मनगटाकडे तिच्या हाताचे तळवे उलटे फिरल्यासारखे विद्रूप दिसत. तिचं नाक बसकं होतं व डोळे बटबटीत होते. तिच्या गळ्याचं हाड पुढें आलेलं होतं. मात्र तिची देहयष्टी पुष्ट होती व उरोभाग जागच्या जागीं भरलेला दिसे. पाठींत तिला पोंक आलं होतं व उंचीनें सर्वसाधारण स्त्रियांपेक्षां ती फूट पाऊण फुटानं तरी उंच होती. लंबूस होती. तिच्याकडे वैभव होतंच म्हणायचं तर तें तेवढं तिच्या केसांचं. मानेवर मागच्या बाजूने तिच्या काळ्याभोर केसांचा भरघोस आंबाडा सारखा लोळत राही; नाहींतर सैल होऊन खालीवर घरंगळत राही. पण आवड्याला यापैकीं कशाचंच देहभान नसे. तिच्या शृंगारांतील जें कांहीं बरंचसं बरं होतं तें सारं आमच कर्तृत्व होतं.

अमाला काळजी होती ती एकट्या आवड्याचीच. आवड्याचं होणार तरी कसं असं सारखं कोरडेपणानं तिला वाटत राही. कुठं आशेला जागा होती असं कांहींच नव्हतं. आवड्याकडे कुणी ढुंकूनही पहात नसे आणि पाहणार नाहींत असं तिचं व्यावहारिक व प्रामाणिक मत बनून गेलं होतं. आणि कुणी पहावं तरी कां आवड्याकडे? आवडा अमासारखी सुंदर थोडीच होती? देखणेपणाचा आणि तिचा छत्तीसचा आंकडा होता हा काय अमाचा दोष थोडाच होता? आणि आवड्याला तरी कुणी कां दोष द्यावा? कुठच्या कुठल्या क्षणाला अमाला आवडा झाली होती आणि अमाच्या सुरळीत सुखी जीवनांत तिनें अडथळा आणला. व्यंग निर्माण केलं. अमाच्या वाईटावर असलेल्या शेजारपाजारच्या एका दोघां भागिणींनीं टेहेळणी करून अमाच्या शेजारच्या बळतपणात तिच्या पोटीं हा आवड्याचा लोढागोळा जन्माला आणला होता. अमा त्यांच्या नांवानें नेहमीच बोटें मोडी.






शंकरापुढेंही तिनें आपलं गाऱ्हाणं तडतडून मांडलं होतं अन् आपल्या अहितावर असलेल्या सर्वांचा सत्यानाश करण्याबद्दल कळवळून विनविलं होतं. अमा एक भावीण होती. पण अमा हीच तिच्या कुटुंबांतील कदाचित् अखेरची भावीण ठरणार होती. अमाची थोरली मुलगी शितू. दुसरी गंगू. तिसरी ही आवडा. मुकुंद व भास्कर हे तिचे दोन मुलगे. आवडा सोडली तर अमाचीं सर्व मुलें देखणी, निरोगी व बुद्धिमान निपजली. अमा गेलीं तीस वर्षे एकाच पुरुषाशीं देवाच्या साक्षीनें, संलग्न होऊन फळलेला व फुललेला आपला संसार संभाळीत होती. निष्ठेनें, संयमानें, श्रद्धेनें, सामर्थ्यानें.

+ + +

अनंत नानांनीं अमाला ठेवली होती. ते जातीनें ब्रामण. शेणवी. आणि अमाला नानांसारखा शेणवी पुरुष देवानें दिला याचा विलक्षण अभिमान वाटायचा. अवाठांतील इतर भाविणींची अवस्था तिला आठवली कीं तर तिचं चित्त बहरून येई. कुणाला कुणी मराठा गावकरानें ठेवली होती. कुणी गांवांतील वाण्याशीं शरीरसंबंध ठेवीत होती. एक-दोघींच्या वाट्याला भट ब्रामण आले होतें. अमा त्यांच्यापैकीं एक भाग्यवती होती. नाना जिवंत होते तोंवर अमाचा तोरा कांहीं न्याराच होता. पिंडानें घष्टपुष्ट, गोरेगोरे पान, मदनाला लाजविणारा देखणेपणा व पौरुष धारण करणारे. अनंत नाना आपल्या गांवाचं परंपरागत कुळकर्णीपण पाहूं लागलें होतें. त्यांचे वडील विटोबा अण्णा म्हातारे होऊन वारले आणि वारसा आपोआपच नानांकडे आला. विशी-बाविशींत नाना आले असतील नसतील. गांवांतीलच शाळेंत त्यांच्या मराठी सात इयत्ता पुऱ्या झाल्या होत्या. नानांचं मोडी अक्षर फर्डं होतं. तालुक्याहून दप्तरें वाचण्यासाठीं त्यांना मानाचं बोलावणं येई. नानांचं लग्न पण झालं होतं. काकीबाय् म्हणून सारा गांव नानांच्या पत्नीला आदरानं ओळखे. एका जमीनदार, सुसंस्कृत व संपन्न घराण्यांत ती वाढली होती. बामणांचा अवाठ देवळापासून खूप दूर होता. त्यांचीं घरें म्हणजे इमलेच होते ते. चौसोपी, पंचसोपी, षट्सोपी असा एकेका घराचा विस्तार होता. प्रत्येक घराला प्रशस्त माडी होती. एसपैस लांबरुंद परडी तर घराला भोवाडा देऊन पोसली जात होती. केळीचीं बनं होतीं. माड होते. हळुहळू वाढीला लागलेले कवात होते. पोफळी होत्या. पानवली, मिरवेली होत्या. सोनचाफ्याचीं झाडं फुलत होतीं. अननस आड्याआड्यांतून मूळ धरून वाढत होते. विहिरी होत्या व विहिरींना रहाट होते. न्हाणीघर होतं. वैभव आणि विपुलता यांचं रुजून आलेलं तें नैसर्गिक प्रदर्शनच होतं जणूं! नानांनीं आपला घरचा संसार नीटनेटका व समरसून केला. कांहीं कुठं खटकलं नाहीं कीं अटकलं नाहीं. बाराबंदी लांब डगला, पायांत पायघोळ शुभ्र व तलम धोतर, डोक्यावर पगडी नाहींतर पागोटं, हातांत पांढरीची वजनदार दणकट काठी, त्यांच्या चांभार कुळानं त्यांच्यासाठीं खास केलेलें करकरणारें जाडजूड वेताळी जुतें, गळ्यांतील जानव्याचे क्वचित् कंठाकडे बाहेर डोकावणारे पदरी जोड, भरदार मिशा व घरच्या पानपट्टीनें रंगलेले त्यांचे मूळचे लालसर हंसरे ओठ...असं नानांचं देवळांत आगमन झालं कीं क्षणभर गाभाऱ्यांतील देवाचं तेज निस्तेज झाल्यासारखं वाटावं. भाऊ गुरव तर त्यांच्याकडे एकटक पहातच राही. मग नानांनींच त्याला खेंकसून म्हणावं...

'काय रे, कुठं लक्ष आहे तुझं?'

'नाहीं...नाहीं...नानानुं...मिया आपलो बघीत व्हतंय...'

'काय बघतोस रे?'

'तुमचा राजबिंडा रूप...दृष्ट लावशील रे बुवा मला...'

'छ्या !...छ्या !...असा कसा होयत् सायबानु...' गुरव सारवासारव करी कशीबशी आणि मग नीटपणं तो नानांच्या हातावर तांब्यांतील तीर्थ ओतूं लागे.

+ + +

दुपारचीं उन्हं परतलीं होतीं. वातावरणावर सांजकळा येऊं लागली होती. डाळकुटावर पडल्या पडल्या अमा आवड्याची वाट पहात होती. मुंबरांत भाजलेला सुका बांगडा व पिठी भात अमानें आवड्यासाठीं पितळींत वेगळा काढून ठेवला होता. पडल्या पडल्या तिच्या डोक्यांत विचारांचा घोळ माजला होता. आवडा येणार तरी केव्हां आणि जेवणार तरी केव्हां असं तिला झालं होतं. उठून पुनः एकदां खळ्यांत जावं. आवड्याला हांका माराव्या, असं तिच्या मनांत येत होतं. पण आपलाच आपण छळ करून घेण्यांत तरी काय अर्थ आहे असं मन उलटून तिला म्हणत होतं. आवड्यानं अमाच्या हांका आजवर कधीं ऐकल्या होत्या, तर ती आज ऐकणार होती! खरं म्हणजे अमा ओरडायची ती आवड्यासाठीं नव्हेच; तें तिचंच तिच्यासाठींच जणूं वत्सल आक्रंदन होतं. पुष्कळदां आवडा अमाच्या पुढ्यांत उभी असायची आणि तरीहि अमा आवडयाच्या नांवानें किंचाळत असायची... 'आवडया गोऽ...' 'गोऽ आवड्याऽऽ'...असं ओरडत.

+ + +

आवड्यानें एकदाचे सगळे कपडे आपटले, धोपटले, पिळले आणि टोपलींत भरले. पण आवड्याला सरळ घरची वाट धरण्याची संवय नव्हती. वाटेवर पहिलं देऊळ रवळनाथाचं होतं. तिथं ती गेली. रवळनाथाला तिनें नमस्कार केला. तोंडानें ती कांहीं पुटपुटली... तिचं कोणतं मागणं होतं देवा रवळनाथाकडे तिलाच ठाऊक! मग तिनें सातेरीचं देऊळ घेतलं...नंतर वेताळ, ब्रह्मनाथ...आणि शेवटीं शंकराच्या भव्य मंदिरांत तिनं पाऊल टाकलं. मागील दारानं ती घरीं आली तेव्हां अमाचा किंचित डोळा लागला होता. आवड्याला सपाटून भूक लागली होती. टोपलींतील पिळण्याबरोबरच टोपली तशींच घळईंत ठेऊन ती चुलीकडे गेली. पितळीवरची पितळी तिनें काढून बाजूला ठेवली आणि पिठी-भात कालवून ती बकाबका जेवूं लागली...घरांत कुणीच नव्हतं. मुकुंदा कुणाकडे शिंग्या आणि

## दीपावली बुद्धिबळ क्र. २

## महत्वाची दुरुस्ती

'दीपावली'च्या नोव्हेंबर ६३ अंकांत 'दीपावली बुद्धिबळ क्र. २' शेवटच्या पानावर दिलेलें होतेंच. परंतु त्यांत नजरचुकीमुळें उभ्या शब्दांमधील पांच शब्द द्यायचे राहून गेले. हें वाचकांच्याहि ध्यानांत आलें असेलच. त्यामुळें आमच्या असंख्य वाचकांचा गैरसमज होण्याची शक्यता आहे. हे बुद्धिबळ सर्व वाचकांना सोडवतां यावे म्हणून 'दीपावली बुद्धिबळ क्र. २' पुन्हा या अंकांत शेवटच्या पानावर देत आहोंत. हें बुद्धिबळ अधिकृत समजावें.

—संपादक








मृदंगी म्हणून गेला होता.. भास्कर चव्हाट्या-वरच्या आपल्या पानविडीच्या दुकानावर विडथा वळायला गेला होता. पोरंटोरं शाळेंत गेलीं होतीं. आवडा मचमच आवाज करीत भसा-भस जेवणाचा भुसा आपल्या भुकेल्या उदरांत भरून घेत होती. तांब्या अखंड तोंडाला लावून गटागटा पाणी पित होती. पाणी पिऊन आवडयानं सटकन् तांब्या खाली ठेवला. तो पितळीच्या कांठाला आपटला आंधळेपणानं आणि निर्माण झालेल्या कर्णकटू आवाजानं अमाची अर्धवट झोप झटकन् उडाली... चुलीकडे आवडा आली आहे हें अमानें ओळखलं...

'आवड्याऽ...'

'काय गो अमा ?...' घरांत आल्यावर आवडा अमाच्या सादीला लगेच प्रतिसाद द्यायची. लुडब्यानें बोलत;

'आयलंस...?

'होय...

'तुझ्या नांवानं मगापासून आरडलेय्...'

'कित्याक ?...'

'तळ्यार् तूं याकटाच...'

'मगे ?'

'मगे गो काय ?...'

'मिया काय बुडांन् मराचंय् नाय...'

'असा ?...'

'माझी तूं काळजी करूं नकोस, अमा...' अमानं तोंड वाजवलं कीं आवडा तोंडाला तोंड द्यायची.

'आवडया तुझा होताला कसा ?...' मग वैतागून अमा म्हणायची...'

'माझो रवळनाथ आसा...'

'काय करतोली ?...'

'काय तरी करीत...'

यावर अमाचं तोंड आपोआपच मिटे. आवडा टोपलींतलं कपडे पुनः पिळून खळ्यांतील दाडीवर सुकत घालायची. किरणें परतलेली असायची आणि देवळाकडे तशीच देऊळ अवाठांतही लोकांची आवक जावक बोलकेपणानें चालू व्हायची. घंटा घणघणत राही. किशा वाजंत्री आपली सनई साफ करतां करतां तिची पिशाणी भेसूरपणं फुंकत बसायचा. पाखरांची चिवचिव पानापानावर व फळाफळांवरून कानावर यायची. देऊळ अवाठांत कुणी मृदंगी मृदंगावर थाप मारीत बसायचा; कुणाकडून तरी उगीचच शिंग फुंकिलं जाई. कुणी तबल्यावर भजनी थाप मारायचा.

\+ \+ \+

संध्याकाळ झाली कीं अमाची प्रदक्षिणेची वेळ होई. ती हातांत फुलपात्र घेई. मागील दारानें देवळांत शिरे. तिथें चाळंद्यावर पांढरपेशांच्या बायका बसलेल्या असत. कांहीं भाविणी पण त्यांच्यांत मिसळलेल्या दिसत. अमानें आंत देवघरापर्यंत जाऊन गुरवाकडून योग्य ते उपचार करून घेतले कीं ती पुढील सभामंडपांतून बाहेर आवारांत येई आणि तिच्या प्रदक्षणांचा कार्यक्रम मूकपणें सुरू होई. अनंत नाना एकाएकी वारले. कसलं तरी विषाराचं निमित्त होऊन. तेव्हांपासून अमानें डोक्याचं कुंकूं पुसून टाकलं होतं. काकीबाय आणि अमा एकदमच विधवा झाल्या होत्या. अमाला तो प्रसंग आठवला. अमाचं कुंकूं पुसून टाकायला कुणी सवासीण आली नव्हती. तिचं तिनंच तें पुसून टाकलं होतं. अनंत नानांच्या समोरच अमाची थोरली शितू मोटी झाली होती. मुकुंदा वाढला होता. गंगू यौवनांत आली होती. आवडा लहानाची मोटी होत होती. अनंत नानांच्या सांगीवरूनच अमानें आपल्या मुलांना शाळेंत घातलं. शितूनं सातवी पास केली. गंगू पण सातवीपर्यंत शिकली. मुकुंदा व भास्कर मात्र शिकले नाहींत. मुकुंदाला मृदुंगांतच अधिक गंमत वाटे. भास्कर दोनतीन वर्षें शाळेंत गेला आणि एके दिवशीं सुपभर कुड्याची पानें व तंबाखू घेऊन विड्या वळीत बसला. अनंत नाना अमाला कौतुकानं म्हणत...

'मुली माझ्या, मुलगे मातर तुझे...'

'तुम्ही म्हणशांत तां खरा...' असं अमा अदबीनं उत्तर देई व स्मित हंसण्यावर नेई...नानांपासून आपल्याला हीं मुलें झालींत हेंच ती परम भाग्य मानी. नंतर पुढें शितूचं लग्न झालं. गोरीपान देखणी मुलगी. तसंच गंगूला पण मागणी आली. नाना स्वतः लग्नांत वावरले होते. इतकेंच नव्हे तर काकीबाय् आपण होऊन पोरींना आशीर्वाद द्यायला आल्या होत्या. दोघींनाही शिकलेले नवरे मिळाले होते. पुण्या-मुंबईकडे सरकारी नोकरी चाकरीला ते लागलेले होते.

'नाना, आतां आवडा उरला...' अमानें लाडांत येऊन म्हटलं...

'तिचां पण बरा होतालां...' नाना ठामपणें म्हणत...

'बगीच्...कायतरी आपलां...' अमानं म्हणावं...

'मी जगलों वाचलों पाहिजे...' नाना एवढं बोलून गंभीर होत...आणि नाना खरंच अगोदरच गेले. नाना जगायला हवे होते; नानांनीं इतक्या लवकर व एकाएकी जायला नको होतें...अमा तुटपुटून स्वतःशींच मग बडबडत राही. आपले मुलगे चांगले शिकले सवरले असते तर...त्यांचीं लग्नें अजून

आणखी कांहीं पाळीव प्राणी !



ह्या मादीच्या पोटांतील गाबुळी साफ केली तर काय मस्त लागेल नाही !

अनुक्रमणिका

व्हायची होती. सुनमुख बंधणाची तिला फार उत्सुकता दाटून येत असे...

प्रदक्षिणा संपली की वेताळाच्या देवळाच्या पाठीमागील वाडींत भटांची पांच-सहा घरें होतीं...त्या वाडीकडे अमाची पावलें वळत. वामन पुजारी हें त्या वाडींतील व गांवांतील सर्वांत मोठं प्रस्थ. वामन भटजींचं मोठं ऐसपैस चौसोपी घर होतं. लग्नाच्या दोन बायका होत्या. पहिलीला मूल होत नव्हतं म्हणून दुसरी केली होती. दुसरीला मुलेंच मुलें होत होतीं. अमाच्याच वयाचे वामन भटजी होते आणि तरीसुद्धां अद्यापि त्यांच्या घरीं पाळणा हालत होता. चौदा-पंधरा मुलांत त्यांच्या घरीं आठदहा मुलीच होत्या. बापासारख्याच निमगोऱ्या. आईसारख्या निमकाळ्या. सौख्यांत अन् निफलतेंत वाढलेल्या. शिवाय वामन-भटजींच्या दोन भाविणी होत्याच. दोघींनाही वामनरावांपासून संतति झाली होती. त्यामुळें संध्याकाळीं देवळाकडे जमून कुचाळकी करणाऱ्या गांवगुंडांना फिदीफिदी हंसायला व पैजा मारायला रान मोकळें मिळे... संध्याकाळीं तरूण मुलींचे घोळके देवासाठी म्हणून घोळक्यानें देवळाकडे जमत. देवळा-पासची मंडळी तर न चुकतां येईच. जमलेल्या मुलींत वामन भटजींची सख्खी मुलें असत तशींच अनौरस संतती पण असेच. त्यांत सर्वां-तून वामनरावांची प्रजा शोधून काढण्याची कुटाळकंपूंत चढाओढ लागे...वामनभटजींना त्याची कधीं खंत वाटली नाहीं. त्यांचा थोरला मुलगा वाळू...चांगला वयांत आला होता. एकेका इयत्तेत दोन दोन वर्षे मुक्काम करीत सातवींत येऊन कायमचाच अडकला होता. वामनभटजींनीं त्याला पुजारीपणाला घेतला होता. मात्र गांवातील जुगारी अड्ड्यावरच त्याचा वेळ जायचा... 'तूं मात्तर वामनभट-जींच्या अस्सल बीजाचो' अशी त्याची जुगारी कंपूकडून कौतुकाची शिफारस होई. आपल्या बहिणींची कुचाळकी केली तरी तो त्यांत निर्लज्ज-पणें सामील होई व 'त्या मात्र माझ्या खऱ्या बहिणी...' असं बोलून हंशाचे मजले उडवी.

अमा वामनभटजीकडे जायची भविष्य विचारण्यासाठीं. शकून काढण्यासाठीं. गंडेदोरे करून घेण्यासाठीं आणि तोच वामनभटजींचा चलतीचा धंदा होता. बाहेर ओट्यावर तुंदिल-तनु वामनाची काळीसांवळी अगडबंब मूर्ति गळ्यात जाडजूड जानवं अडकवून आणि कमरेखालीं कळकटलेला पंचा नेसून 'हरि ॐ' 'हरि ॐ' करीत बसलेली असे. समोर पंचां-गांचे ढीगच्या ढीग बांधून ठेवलेले असत. एक अंगाऱ्याचं हातभर खोलीचं चौकोनी कुंड समोर तयार केलेलं होतं एक जुनी जीर्ण लांकडी पेटी बाजूला असे. तिच्यांत निरनिराळ्या गांठी मारून ठेवलेले दोरे असत. कपाळावर गंधाची भक्कम बोटें फासलेले व टाळूवरील केसांच्या भोवऱ्यामधोमध शेंडीची गांठ मारून ती शेंडी ताठ उभारून ठेवणारे हे वामनभटजी खरोखरच कुणा पाताळयंत्री सैतानासारखें भयावह पण कांहींसें गूढ वाटत. केव्हांही त्यांच्या दारांत त्यांच्यापुढें दहा-पंधरा गांवठी मंडळी बसलेली दिसे. महार, चांभार, कुंभार, पांढरपेशे, देवदासी, खिश्चन, मुसलमीन सुद्धां तिथें वाट धुंडाळीत येत असत. दोन-चार आण्यापासून तो रुपयापर्यंत जास्तींत जास्त मामला असे. बाकीचीं भटांचीं घरें जेमतेम जिर्णे जगत होतीं. आपली देवाची वहिवाट पहात होती. पुजारीपण करीत होती. त्यांचीं मुलें शाळेंत जात होती. शेतीवाडींत रमत होतीं. सर्वांना अर्थातच वामनभटजींचा हेवा वाटे. द्वेष सुद्धां...मात्र वामनभटाला कुणाची पर्वा नव्हती. त्यांची बरकत वाढतच होती.

अमा वामनभटजींच्या दारांत उभी राहिली तेव्हां सांज संपून गेली होती. वामनभटजींच्या पुढ्यातील मंडळी पण निघून गेली होती. वामनभटजी हायसे होऊन शतपावल्या करीत होते. तोंडानें रामरक्षा म्हणत होते. मधून मधून पोराबाळांना घरांत हांक मारीत होते. गोठ्यात गुरें कशी बांधावीत याची समज गुराख्याला ओरडून देत होते. अमा भाबीण अशी अवेळी आलेली पाहून त्यांनीं क्षणभर चमकून पाहिलं पण तिचा हा रिवाज त्यांच्या चांगलाच परि-चयाचा होता.

'कशाला आलीस...?' त्यांनीं खडसून विचारलं.

'असाच आयलंय् जरा...'

'बस...'

आणि अमा तिथेंच बाहेरच्या ओसरीवर बसून राहिली. तिच्या मनांत अनंत प्रश्नांची दाटी झाली होती. भटजींना ती त्यांपैकीं विचार-णार तरी किती न भटजी उत्तरें तरी कितींची देणार हें तिचं तिलाच कळत नव्हतं. वेळही अवेळच होती. ती उठली तेव्हां तिचा बेत फिरला होता. चटकन् उभी राहून ती भटजींना म्हणाली,

'काय सांग भटजींनु...मीया आपलो तुमका बघूक आयलंय.'

'म्हणजे गो काय?...'

'बरे आसात ना?...'

'मला काय धाड भरली आहे?...' भटजींचा तोंऱ्यांतील आवाज.

'कधींतरी येऊन दांखारचा...म्हणतेय...'

'ये ये...' म्हणतच रामरक्षेची पदावली जोरजोरात म्हणायला भटजींनीं सुरवात केली आणि अमा एकएक पाऊल खळ्यातून जपून टाकीत पुनः देवळाच्या व आपल्या अवाठाच्या वाटेला लागली. तिच्या आवडयाचं भविष्य ती भटजींना विचारणार होती...पण ओठा-वरचं पोटांतच ठेवून ती माघारी परतली होती.

\+ \+ \+

आवडा हें नांव होतं म्हणून; नाहींतर आवडा ही सर्वांचीच नावडा होती. अमाची गोष्ट वेगळी होती. किती झालं तरी तिच्या पोटचा गोळा होता तो. अनंत नानांची अंतिम स्मृति होती ती. आठवण आणि ठेवण... आणि आवडा कांहीं अगदींच अडाणी नव्हती. तिचा मेंदू धड होता. शरीरयष्टि दणदाकट होती. तिला सर्व कांहीं समजे व मानवी स्वभावाचं आकलन तिला तीव्रपणें घडत असे. आपली चाल कशी ठेवावी याची उमज तिला होती. लहानपणापासून तिच्या शारीरिक व्यंगाच्या भोंवताली उपहास चालला होता. पोरांपासून तो थोरापर्यंत ती थट्टेचा व चेष्टेचा विषय झाली होती. अमाच्या कांहीं हितशत्रू भाविणींची मजल तर भलतीकडे गेली होती. आवडा ही अमाची मुलगी होती हें खरें; पण ती तिला अनंत नानापासून मुळींच झालेली नव्हती. अमानें अनंत नानाच्या नांवें कुंकू पुसून टाकलं म्हणून कांहीं तिचं ढोंग लपून राहणार नव्हतं. 'आवड्या, तुझो बापूस कोण?' म्हणून आवड्याला अचकट विचकटपणें कितीदां तरी विचारलं जाई. मग स्फोटक कुत्सिक हास्याचे भोंवती फवारे उडत. मग पुढें थांबून प्रश्न विचारला जाई,... 'आवड्या, तुझा लगीन गो कधीं जातालो?...' आणि आवड्यासाठीं गांवात किती व कोणते नवरे मुलगे टपून बसले आहेत यांची एक बिभत्स यादी तोंडानें उच्चारली जाई. थिटा आणि लुळा गजा नतारी; वेडसर आणि कुबडा जन्या सुतार; लाळ ओकीत नागडा उघडा फिरणारा गांवांतील एक मुका,... आवड्याला सर्व ऐकून घेण्याची सवय झाली होती. तिचे

डोळे समोंवार सर्वत्र सारखंच टिपून घेत. तिला तिच्या घरांतही तिचे भाऊ किती जांच करीत. कितीदां तिची पाठ जास्वंदीच्या ओल्या काठीनें मुकुंदानें फोडून काढली होती. तिच्या हातचें जेवण तर घरांत होतच नसे. अमालाच स्वयंपाकाचं बघावं लागे. सारं निस्तारावं लागे पण अमालाच ! मुकुंदा अलिकडे वासूभटाच्या 'कंपनींत' मिसळूं लागला होता. आणि वासूबरोबर इतर कुटाळ मित्र कधीं कधीं अमाच्या घरीं बैठका झाडूं लागले होते. आवड्याला पुढील दारी येण्याची सक्त मनाई होती व मागील दारच्या निवतीच्या खोली-जवळच्या कोंबड्या–कुत्र्यांच्या काळोख्या खोलींत आवड्याला आपला बाडबिस्तारा ठेवावा लागला होता. बिस्तारा कसला तो ! एक फाटकी गोदडी, कांबळ, तिचीच दोन तीन जुनेरं ! आवडा ही अवदसा आहे असं मुकुंदाचं ठाम म्हणणं होतं. अमालासुद्धां तो फाडफाडून बोलत असे व आवड्यावर तर तो अद्वातद्वा तोंडसुख घेत असे... 'तुका फटकी गो कशी नाय भरना'... 'तूं या तळ्यांत जावून् जीव गो कित्याक् नाय देनंय्'... 'तूं मेलंस् म्हणजे आमी सुटलोव्...' अशी अमानुष भाषा तो बोलूं लागला कीं आवडा निमूटपणें मागीलदारी आंतल्या अडगळीच्या खोलींत रावणीला बसलेल्या कोंबडीसारखी चिडीचीप होऊन बसे. कदाचित् मुकुंदाचा हात तिच्या अंगावर पडायचा संभव तिला सहजतेनें जाणवला तर ती मनाची व देहाची तयारी पण निगरगट्ट-पणें करून ठेवी. अमाला तर तोंड दाबून हा मुका मार मेल्यासारखा सहन करावा लागे. आवड्याच्या पायगुणामुळेंच मुकुंदाच लग्न होत नव्हतं असं त्याला त्वेषानें वाटूं लागलं होतं. म्हणूनच मुकुंद घरांत रिघला कीं आवडा हळूंच काढता पाय घेई व अवाटांतील घरें धुंडींत काढता येईल तितका वेळ काढीत राही. शेजाऱ्यापाजाऱ्यांचा शाब्दिक उपहास तिला घरच्या त्राग्यापेक्षां सह्य वाटे.

÷ + +

लहानपणापासून आवडा अमाबरोबर देवाच्या सेवेला जाई. झाडलोट, दिवाबत्ती, जाजम अंथरणें, पालखीमागून उभं रहात मूर्तींवर चवरी ढाळणें, रवळनाथ, वेताळ, गावडोबा, सातेरीसारख्यां छोट्या देवळींतून शेणसडा करणें, उत्सव जत्रा आली कीं धर्मशाळेंतील शेणसारवण करणें, भांडींकुंडीं पाण्यानें भरून ठेवणें, कुणी छोटे मोटे देवभक्त किंवा भक्तिणी आल्या तर त्यांच्या दिमतीला रहाणें; भांडीं घासणें; त्यांचीं वस्त्रें धुणें, त्यांच्याबरोबर राहून त्यांना वेगवेगळ्या देवळांतून फिरवून आणणें, त्यांच्यासाठीं चव्हाट्यावर जाऊन सामानसुमान आणणें,... त्यांचा निरोप पोचता करणें, आणि म्हणूनच आवड्याला अमा सर्व आपलीं कामें सोपवून देई. वामन भटजीकडे वारंवार जाण्याचे प्रसंग आवड्यावर येत. वामनभटजी तिच्याकडेसुद्धां आधाशीपणें पहात. तिच्या छोट्याशा कामा-साठीसुद्धां मोठा वेळ घेत. अशीच आवडा एकदां संध्याकाळीं नौबतीच्या टिपेवर, वेताळाच्या देवळांतील समईच्या वाती नीट करून मागील पाणंदींतून अमाचा कसला तरी निरोप घेऊन वामनभटाकडे गेली...काळोख किट्ट दाटत होता. रातकिडे किरकिरूं लागले होते. पायाखाली जीवजीवाणूं वळवळण्याचा दाट संभव होता. पण नेहमीच्या ठेक्यांत व संवयींत बेडरपणें आवडा पावलें टाकीत होती. आपण

भाविणीची पोर आहे; जातीनें हलकी आहे; रुपागुणांनीं तर आणखीच हलकी आहे; वामनभट किती झालं तरी भट आहे. त्याची जात सर्वांत मोठी आहे. तिला मान असतो. ती शुद्ध जात आहे. आपण त्यांच्या घरीं जात आहोंत. कुठें कांहीं भ्रष्टाकार होऊं देतां कामा नये; आदबीनें वागलं पाहिजे; कशाला चुकून सुद्धां स्पर्श करतां नये; कांहीं विटाळतां नये; तशांत वामनभटजी मांत्रिक आहे; देवदेवस्की करणारा आहे; त्याला माणसांच्या मनांतील सर्व कांहीं कळतं; पुढचं पण सांगता येतं; भूत पिशाच्चें त्याला वश होतात; तो देवच आहे. तो देवाचा माणूस आहे; आपण काय बोलून चालून देवदासी...आपण दासपण करायचं; अमानें तें जन्मभर केलं होतं. अमा देवाची दासी होती: तर वामनभट देवाचा मालक होता. ...त्याच्याशीं आपण बोलतांना सुद्धां खालीं मान घालून बोललं पाहिजे...त्याचा राग वाईट...कोपिष्ट पण आहे तो. आपण पाहिलेल्या वालावलकरांच्या दहिकाल्यांतला तो विश्वामित्र जसा...तसा...आवड्याला कधीं कधीं उफाळून वाटे आपण सुद्धां आपलं नशीब वामनभटाला विचारावं...आपल्याच तंद्रींत आणि विचारांत फेंगडेपणानें एखाद्या पिशाच्चासारखी आवडा चालली होती. कुणा परक्याला अशा काळोखांत ती अशी सामोरी गेली असती तर तो गर्भगळीत होऊन कोलमडला असता...पण देऊळ अवाठाला आवडा आतां पूर्ण परिचयाची झाली होती... आवड्याचं केसाचं कृष्णवैभव मात्र तिच्या मानेवर तशा त्या काळोखांतहि लोळत होतं; चोळामोळा होत होतं.

आवड्यानें भटजींचं घर समोर आलं म्हणून जरा स्वतःला सावरलं. तिला आखाडा ओलांडून आंत जायचं होतं. प्रथम ती भटजींच्या मागील दारीं जाणार होती. भटणीला हांक मारणार होती. आणि मग वामनभटांच्या गोष्टीला येणार होती. अमानें भटजींकडे एक मंतरलेला दोरा मागितला होता. जो ती आपल्या नातवांना पुण्या–मुंबईला पाकिटांतून पाठवणार होती. भटांच्या घराच्या कोपऱ्यावर एक प्रचंड पिंपळ सळसळत होता. त्याचा विस्तार केवढातरी वाढला होता व दाटला होता. त्या पिंपळाच्या आजूबाजूनें दाट झाडी होती. खालूनच जरा पैल बाजूनें घाडयांच्या अवाठाकडे जाणारा देव ओढा वहात होता. कुणा शेतकऱ्याचा एक पडका मांगर चुडतांच्या शाकारानें झांकलेला व दोरी दांडे घालून बंद केलेला भकासपणें उभा होता. बाकी भोंवती सारं सामसूम होतं. कुणी त्या बाजूला रात्रीं फिरकत नसे. जरा पलिकडे देऊळवाडयाचं स्मशान किर्रपणें बेढब शांतता बाळगून भयाणपणा ओकीत होतं. आवडयानें आखाडा ओलांडायला म्हणून पुढें पाऊल टाकलं... आणि कुणाचा तरी ऊष्ण श्वास तिच्या मानेवर झटकन् आल्यासारखं तिला वाटलं... पण तिच्या स्थूल कल्पनाशक्तीला कसलीच कल्पना आली नाहीं... क्षणांतच तिच्या बगलेंत हात घालून कुणीतरी तिला मागें खेचलं... तिचा तोल ढळला. तिला धड ओरडतादेखील आलें नाहीं. तिच्या तोंडावर गच्च हात दाबून धरण्यांत आला होता आणि तिची बोबडी बोंब बंद पाडण्यांत आली होती...

'क...क...क...को...ऽऽण ?...' एवढंच ती बोलली...

'मी...मग सांगतो सगळं तुला ?...चल...'

'कु...कु...कु...ठे ?...'

'मी म्हणेन तिथें...'

'...क...क...का...?'

'कळेल...'

आवड्याला झपाझप चालवीत, ओढीत, फरफटीत, तिच्या बुचड्याला धरून वासूभटानें पिंपळाच्या बाजूनें त्या पडक्या मांगरांत नेली... काळोखांतूनच. ती कासावीस होऊन कळवळत असतांनाच. बापासारखाच काळाकभिन्न तो वासूभट आपल्या कृष्णकृत्याचा पहिला पाढा सहज दुष्टपणानें मोजूं लागला होता. त्यानें मांगचें तें चुडताचें दार आपल्या आडदांडपणानें पेंचून उघडलें आणि आवड्याला आंत धाडकन लोटून दिली. आवड्याच्या डोळ्यासमोर काजवे चमकले. तिचं मस्तक कशावर तरी आडवे तिडवं आपटल्यामुळें सुन्न झालं होतं. दुर्दैवी स्त्रीचे नाना भोग बाह्यतः ती आजवर भोगत आली होती. तिचा शाब्दिक उपहास झाला होता. शारीरिक छळ तिनें अनुभवला होता. पण आतां तिच्या वाटेला आलेली कळ अगदींच वेगळी होती. आवडयाला कसला तरी अबोध बोध बधिरपणांत सुद्धां होऊं लागला होता. तिच्या नेहमीच्या तीव्र झालेल्या सहज संज्ञेनें ती उमजली...पण हा होता कोण...? देवदासी होती ती. तिचा भोगच घ्यायचा होता तर तो तिच्या रवळनाथाचा अग्रहक्क होता. प्रथम ती देवाची होती. नंतर माणसाची आणि हा आतां येणारा भोग तिच्या वाट्याला कशासाठीं येत होता ? कुणाची वासना इतकी आंधळी होती...? इतकी लंगडी व पांगळी होती...!...कुठें...कसा...कोण...कां....आवडयाला काय घडतं आहे, काय घडणार आहे हेंच नीट कळेनासें झालें...कळत असूनहि कळेनासें झालें...तिच्या शारीरिक कळा अधिकच वाढल्या. कुठेंतरी कुणीतरी तिच्या अंगावर आदळलं होतं. खिळलं होतं. खेळत होतं. तिला कळावर कळा येत होत्या. कांहीतरी वेगळंच वाटत होतं. तिचा अवयव न् अवयव पिळला जात होता. तिच्या मांसांत वेदनांच्या सहस्र सुया कुणीतरी निष्ठूरपणें टोंचीत होतं. तिची मुळचीच फाटकी अमंगळ वस्त्रें कुणीतरी फाडून चिंध्यां करीत होता ! तिच्या ओठाला फसलेतरी चावे चावून दुखत खुपत

## बाईमध्यें बुवा !



एका अध्यापिकेनं आपल्या वर्गांतील एका विद्यार्थ्याच्या प्रगतिपुस्तकांत लिहिलं—

'...तसं पाहिलं तर आपला मुलगा बुद्धिमान आहे, पण त्याला मुलींतच उठणं–बसणं सारखं आवडतं. त्याची ही संवय घालवण्यासाठीं एखादी युक्ति सुचतेय कीं काय तें मी पहात आहे.'

प्रस्तुत प्रगतिपुस्तक त्या विद्यार्थ्याच्या आईच्या हातांत पडलं, तेव्हां त्यांतला सारा मजकूर वाचून, तिनं त्या अध्यापिकेला पत्र लिहिलं तें पुढीलप्रमाणे होतं—

'आपण घेत असलेल्या माझ्या मुलाच्या काळजीबद्दलं मी आपली आभारी आहे. आपल्याला जेव्हां ती युक्ति सुचेल, तेव्हां कृपा करून मला ती तातडतोब कळवावी म्हणजे मग तिचा उपयोग मी मुलाच्या वडिलांवर करून पाहीन.'



अनुक्रमणिका

होतं. तिला धड बोलतां येत नव्हतं. कुणी तिच्याशीं बोलत नव्हतं... एक आडदांड, आकस्ताळा, अमानुष हात तिच्या अंगांगावरून सारखा फिरत होता. बोचकारीत होता. कुचकारीत होता. केस आणि कपाळ ओढीत होता व आदळीत होता...काळोख काळेपणानं डोळे झांकून सर्व कांहीं तटस्थपणें पहातच होता. त्याला साक्ष ठेवून करणारा आपलें कृत्य उरकून घेत होता... काळ जणूं थांबला होता ...! नंतर सारं कांहीं थांबलं होतं. आवडयाला धड उभं राहतां येत नव्हतं... धड बसतां येत नव्हतं. धड काय घडलं हेंही जाणतां येत नव्हतं...तिचे विस्कटलेले कपडे कुणाचा तरी हात तिच्या अंगावर चापचोप बसवित होता. कुणीतरी आपलें वस्त्र सरसरून सारखें करीत होता...

'आवडया...' मसाडा बेचव आवाज बोलला...

'हं...हुं...' आवडा फक्त कण्हली...

'आवड्या...ऊठ...'

'क...क...' कांपत आवडा एवढंच बोलली...

'आवडया...' तिचा बुचडा धरून त्याने तिला उभी केली...डोळे फाडून पण आवड्याला कांहीं दिसत नव्हतं. कोण तें ओळखूं येत नव्हता...

'मी...मी वासू भट...'

'क...क...का...य ?...'

'मी वासू भट...'

'भटजीनुं...तुम्ही...?...' आवडयाला अचंब्याबरोबरच कंठ पण फुटला...लुडबं अडखळत ती बोलली...

'होय...मीच...वासू भट...'

'काय केलांत या भटजीनु ?...'

'ठीक केलं...मोठी मजा आली...'

'भटजीनु...

'काय ?—'

'मीया आतां घरांक् कसा जांव्...'

'ईलस तसाच...,'

'क–क–सा ?....'

'आवडया...'

'काय भटजीनुं...?'

'ध्यानांत ठेव. आजपासून तूं माजी भावीण झालीस...'

'भावीण...?'

'होय...भावीणं...माझी...वासू भटाची...'

'भटजीनुं...लोक हंसतलेत तुमका...'

'दांत पाडीन त्यांचे...'

'माका पण...'

'म्हणतो ना...दांत पाडीन सर्वांचे...'

'मी ...मी...आवडा आसंय् भटजीनुं...'

'मला माहीत आहे...'

'चुकान्...

'चुकून नव्हे; ठरवूनच...'

'पण...भटजीनु...'

'काय ?...'

'देवाच्या साक्षीन्... भावीण ठेवची आसता...'

'मी सगळं करीन...चल...'

'क–सा नि–घूं ?...'

'निघ म्हणतो ना ? आणि लक्षांत ठेव... मी तुझ्या घरांत येणार नाहीं...उद्यां रात्रीं रवळनाथाच्या देवळांत गाभाऱ्यांत मी वाट पाहीन तुझी...'

'गा...भा...ऱ्यां...त...'

'होय...तिथं ये...'

पुन्हां कुणी कुणाशीं बोललं नाहीं. वासू भटाचं जुतं करकर वाजत आपल्या घराचा मार्ग कापीत होतं. त्याच्या नसानसांतून त्या घटकेला वेगळं धुंदीचं रक्त सळसळत होतं. 'जितं मया' अशा अचाट आविर्भावांत तो शंकट ब्रह्मपुरुष बदफैली मस्तवालपणें चालला होता. देवळांत जागर सुरूं झाला होता. शंकराच्या गाभाऱ्यांतील लहान-मोठ्या घंटा एकाच वेळीं वेगवेगळ्या मंजुळ धन स्वरांत भैरवगीत आळवीत होत्या. रात्र बरीच झाली होती. देऊळ आवारांत घरोघरीं पेजपाणी होऊन दिवे विझले होते. देवतळ्यावरील बांधावर जाणाऱ्या–येणाऱ्यांची पावलें सरसरत होतीं. त्यांच्या हातांतील लाटण पिटपिटत होते. दांडे दणकटपणें जमिनीवर आदळल्यामुळें खटखटाट होत होता. ओवळीखालची फातर रिकामी सुन्न होऊन प्रसन्नपणें शांत असलेल्या तळयाला तटस्थपणा आणीत होती. बिचारी अमा तेवढीच एकटी जागी होती आणि अंगणांत येऊन किंचाळत केकाटत आवडयाला साद घालीत होती...

'आवडया गो... '

'गो ऽ ऽ...आवडया... '

आवडयाचं एक एक पाऊल मणामणाचा दगड होऊन पाणंदीतल्या वहाऱ्यावर खरचटत होतं व फरफटत धुळीवर उमटत होतं.

●●●













*संस्कृत साहित्यांतील शृंगाररसाची रसपूर्ण छटा खुलवून दाखविणारा*



*माधुरी काय वर्णावी ? शृंगार नायिकांची हा अभ्यासपूर्ण वाचनीय लेख......*

# नववधू प्रिया मी....

—आनंद साधले

**प्रेम्णो मौग्ध्यविभूषणस्य सहजः कोऽप्येष कान्तः क्रमः ॥**

( अमरू शतक ४८ )

'जी विपरीतरतीच्या आसनामध्यें तुम्हांला कल्पानंदाकडे नेत आहे, जिची वेणी ढिलावल्यामुळें सुटे झालेले कुंतल विलोल चांचल्यानें नाचत आहेत, जिच्या कानांतील रत्नामाणकांचीं कुंडलें, जणुं सजीव झालेली रतिसुखाची शिरशिरीच अशा प्रकाशशलाका हालचालींबरोबर चहुंवार विखरीत आहेत, उत्तम सुगंधी स्वेदबिंदूंनीं जिचा कुंकुमतिलक ओलावला आहे, सुरतसमाधी जवळ जवळ आल्यानें जिचे नेत्र तरल झालेले आहेत, अशा तन्वंगीचे मुखकमल तुमचें कल्याण करो. ब्रह्मा, विष्णु आणि महेश या देवांच्या हातून काय होणार आहे !' (अ. श. ३)

अमरूशतक या विख्यात संस्कृत ग्रंथाची ही नांदी आहे. सकृत्-दर्शनीं ही नांदी विपरीत वाटेल. पण वस्तुतः इतकी यथार्थ नांदी दुसरी कोणतीच असूं शकणार नाहीं. ऐहिक जीवनांतील सारें कल्याण हें पतिपत्नीच्या एकतेवर अवलंबून असतें. या एकतेचें कमल हें शृंगाराच्या पंकामधून उमलत असतें. रतिसुखाच्या कल्पानंदांत सजीव झालेली एकतेची भावना हीच जीवनयशाची गमक आहे. आणि याची बेडर जाणीव ठेवून काल्पनिक देवांचा अधिक्षेप करण्यांत अमरूनें औचित्यच दाखविलें आहे.

पाश्चात्य परंपरेत सुधारलेल्या आजच्या संस्कृतींत शृंगार हा व्यवहार झाला आहे आणि त्यांतील काव्य लोपलें आहे. साहजिक आहे. Blonde आणि Brunette या स्त्रियांच्या दोनच जाती आणि गुढघा उघडून दाखविणें हाच विभ्रम, इतपतच ज्यांची प्रगती झाली आहे त्यांच्यांत कामक्रीडेच्या ( Sex ) व्यवहाराचा सुकाळ असला तरी शृंगारांतील काव्याचा अभाव असावा यांत नवल नाहीं. शाकुन्तला-सारख्या नाटकांतील शृंगाराच्या दर्शनानें 'स्वर्ग तो हाच' असे उद्गार त्यांच्यातील विदग्ध पंडितही काढतात त्याला कारण हेंच.

परंतु ताटकेपासून सीतेपर्यंतच्या स्त्रिया ज्याअर्थी या सृष्टींत दृष्टीस पडतात. त्याअर्थी कामशास्त्राच्या दृष्टीनें सुद्धां, कामशांतीचें एक साधन, यापेक्षां अधिक व्यापक चिंतनाचा त्या विषय व्हाव्या, हेंच सुसंस्काराचें लक्षण होय. त्या दृष्टीनें पद्मिनी, चित्रिणी इत्यादि स्त्रियांचा विचार करणारें आपलें कामशास्त्र आणि मुग्धा, मध्या इत्यादी नायिकांचा विचार करणारें आपलें साहित्यशास्त्र हें अधिक प्रगत होय. साहित्य शास्त्राच्या स्थूल अभ्यासांत सुद्धां नायिकांचे एकशें आठ भेद कल्पिले आहेत त्यावरून या अभ्यासाच्या व्यापक सूक्ष्मतेची कल्पना येईल. या नायिकांचीं व्यवच्छेदक लक्षणें हीं मनोगम्य असून त्यांची जाणीव ठेवून आस्वादिलेला शृंगाररस हा 'स्वर्ग तो हाच' या पदवीस पात्र होय. आपल्या आगळ्या रसास्वादानें हा शृंगार मूर्तिमंत काव्य बनावा यांत काय नवल ! विधात्याचें मूर्तिमंत काव्य जी स्त्री, तीच याच्या अभ्यासाचा विषय असल्यानें काव्य बनण्याचें अहोभाग्य या शास्त्रीय अभ्यासास लाभलें आहे. एवढेंच नव्हे तर क्षणांत ग्राम्य होऊं शकणाऱ्या या नाजूक विषयास स्वर्गीय पातळीचें सुसंस्कृत स्वरूप देण्यांत आपल्या साहित्य शास्त्रकारांनी अलौकिक प्रतिभेचे अपरिमित उन्मेष साकार केले आहेत.

या सूक्ष्मतेची मर्यादा कल्पून कल्पितां येणार नाहीं. वरील नांदीमध्यें नायिकेला जो घाम आला आहे त्याचें वर्णन उत्तम घाम असें केलेलें आहे. घामासारख्या गोष्टींमध्यें उत्तम तें काय असावयाचें ! पण संस्कृत शास्त्रामध्यें नायिकेच्या घामाच्या उत्तम, मध्यम आणि अधम अशा जाती आहेत. संपूर्ण रतिक्रीडा संपल्यावर ज्या नायिकेला थोडेसें स्वेदबिंदू येतात न येतात तिचा स्वेद हा उत्तम होय. अशी नायिका ही सुगंधिनी असते. द्रौपदी अशी योजनगंधा नायिका होती. रतिश्रमांच्या समप्रमाणांत जिला घाम येतो तिचा घाम मध्यम होय. रतिक्रीडेला सुरवात करतांच जी घामानें भिजून जाते त्या घामट आणि दुर्गंधिनी स्त्रीचा घाम अधम होय. एकपत्नीव्रताच्या या दिवसांत हा स्वेदबिंदूचा रसास्वाद अनुभवगम्य होणें शक्य नसलें तरी तो रसिकांना मनोगम्य वाटणार नाहीं काय !



अनुक्रमणिका

अशा सूक्ष्म सूरन छंदांच्या रम्य आस्वादावर आधारलेला संस्कृत साहित्यांतील शृंगाररस–त्याची माधुरी काय वर्णावी ? शृंगारास वाहिलेलीं जीं काव्यें संस्कृतांत आहेत त्यांतील श्रेष्ठ काव्यांत अमरू शतकाची गणना होते. अमरूच्या एकेका श्लोकांतून शंभर शंभर प्रबंधांना विषय मिळूं शकतील असें अमरूचा एक टीकाकार म्हणतो. या काव्यातील शब्दांतून अनुस्यूत असलेले शृंगारविश्व पूर्णपणें साकार करणें केवळ अशक्यच आहे. मुग्धा नायिकेचें जें दर्शन या काव्यांत होतें त्याचा थोडासा परिचय इथें करून द्यावयाचा आहे.

मुग्धा नायिका ही स्वीया असते. स्वीया याचा अर्थ आपली असा असला तरी त्यांतून नुसती लग्नाची बायको असा भावार्थ अभिप्रेत नाहीं. लग्नाची बायको परपुरुषानुरक्त असूं शकते. स्वीयाचा अर्थ पतिव्रता असा आहे. मग ती लग्नाची असो वा नसो. मुग्धा म्हणजे जिच्यामध्यें कामवासनेपेक्षां लज्जाभाव अधिक प्रबल असतो आणि जिच्या कोणाला अजून धार आलेली नसते अशी नायिका. चपखल भाषांतर म्हणून नव्हे सौकर्यासाठीं म्हणून या नायिकेचा उल्लेख इथें नववधू असा केला आहे.

या नववधूला क्षणभर एकांत मिळाला आहे आणि त्या क्षणांतच ती आपणाला विसरली आहे. तिची समाधी लागलेली आहे. कांताची मूर्ति तिला समोर दिसत आहे आणि ती एकटक त्याच्याकडे पहात आहे. केवळ दोनच डोळ्यांनीं नव्हे. तिच्या रोमरोमानेंच डोळ्याचें रूप घेतलें आहे. हृदयाच्या गाभ्यांत जोपासलेल्या भावरम्य अभिलाषा आणि संकल्प या नयनांतून नकळत वाऱ्यावर उधळत आहेत. हे सारे संकल्प गोडगोड झिणझिण्या आणणारे. ते मनांत कधीं आणि कुठून येऊन बसले, वाढीस कसे लागले, तिला कांहीं कळलेलेंच नाहीं. हे सारे लज्जेच्या पडद्याआड लपून बसलेले असल्यानं त्याचें स्वरूप तिला आजही नीट माहीत नाहीं. तिनें त्यांचा कधीं विचार, उच्चार केलेला नाहीं. पण हे सारे अबोध संकल्प आतां डोळ्यात एकदमच ओथंबले आहेत. त्यामुळें डोळे मंथर झालेले आहेत. त्यांचें सौष्ठव आळसलें आहे. कमलपरागात गुन्तलेला भृंग ओढून काढला असताही निसटूं नये तसे प्रियदर्शनाच्या रसपानामध्यें उत्फुल्ल झालेले हे तिचे डोळे कांतावरून हालतच नाहींत. हे जणूं प्रीतीच्या स्निग्धाईनें त्याला न्हाऊं घालत आहेत. मध्येंच क्षणभर ते अर्ध मुकुलित होत आहेत. चिरवांछित मिष्टान्नाच्या आकंठ सेवनानें सुस्ती यावी तसें माद्य जणूं या डोळ्यांना आलेलें आहे. पण मंदतेनें अर्धमीलित होणारे हे नेत्र निमिषासाठींहि मिटत मात्र नाहींत. जणूं उघडझाप केली तर दर्शनसुखामध्यें अंतराय पडेल असें त्यांना वाटतें आहे आणि असें पहात असतां ' नको नको ' म्हणून टोंचणारी जी मेली लाज छळत आहे तिचा तर अर्थच कळत नाहीं. आजवर इतक्या पुरुषांकडे पाहिलें पण कधीं लाज वाटली नाहीं. मग आजच ही लाज कुठून आली ? कीं हें अनुरागाचें लक्षण आहे बरें !'

वेडी ! जगांतील सारी सौंदर्यसंपदा एकरास व्हावी तशा तऱ्हेनें ही कांताकडे पहात आहे. आपणाकडे कोणी पहात नाहीं असें तिला वाटतें. पण जाणकारांनीं सूक्ष्म नजरेनें तिचें इंगित कधींच जाणलेलें आहे. तिला मुळींच नकळतां तिनें केलेल्या अनेक गोष्टी त्यांनी पाहून ठेवल्या आहेत. कांत समोर उभा असतां ती त्याकडे पहात नाहीं. त्याची नजर आपणावर पडल्याचें दिसतांच हिच्या गालावर कमळें फुलतात. नजर खालीं वळते. ती सारखा पदर सांवरीत असते. कुणाचें लक्ष नाहीं असें वाटेल तेव्हां मात्र हिची चोरटी नजर कांता शिवाय दुसरें काहींच पहातं नाहीं. त्यानें कांहींही विचारलें असतां पहिल्यांदा हिच्या मुखावर स्मित फुलतें. अस्फुट अक्षरांनीं, मुक्त असें मंद मंद तो कांहीतरी बोलते. त्याच्या आसपास जितकें रहातां येईल तेवढी ही नकळतच रहाते. दुरून त्याचें आपणाकडे लक्ष जावें म्हणून ही सखीशीं अवखळ कांहीतरी बोलते. उगीच कांहींतरी पाहून हिला भलतेंच कांहींतरी सुचतें आणि हसूं फुटतें. दुपारीं बोलता बोलता अवचितच हिनें सखीला मिठी घातली; आणि तिच्या गालाचा नाजूक चावा घेतला. कुणी एक माणूस त्याचा परिचित आहे असें कळताच तिला तो आदर्श वाटूं लागतो. त्याच्या दासींना ती सारखीं कामें सांगते. उद्देश असा कीं त्यांनीं संधी मिळेल तेव्हां त्याचें वर्णन करावें, पूर्ववृत्त सांगावें आणि तें ऐकून तिला सुख व्हावें. त्याच्याशीं कुणींहि, पुरुषानें सुद्धा, सलगी केली, नर्म संभाषण केलें कीं हिला असूया वाटते आणि ती हिला लपवितांहि येत नाहीं.

दुपारीं तिच्या कांताला उपवस्त्र पाहिजे असा निरोप त्याच्या दासीनें आणला. या बावळीनें आपलीच काढून ठेवलेली कंचुकी आपल्या सखीकडे दिली. सखीनें तिच्या कंठींत बकुळीचा हार काढून दासीकडे दिला. याचा अर्थ काय होणार आहे ? सकाळीं देवदर्शनाच्या वेळीं कांताच्या अंगावरून ओघळलेली पुष्पमाला हिच्या इवल्याशा वक्षस्थलाभोंवतीं, कंचुकींत लपून बसली आहे. मांजर डोळे मिटून दूध पिते. त्याच्यासारखीच हिचीं गत. हिला वाटलें आपण मोठी नजरबंदी करीत आहोंत. पण ती कधींच पकडली गेली. तिला त्याची जाणीव झाली नाहीं एवढेंच.

आणि या पकडलें जाण्याच्या नेणिवेंत घटिका बुडाल्या. धुंदींत, तरलतेंत, स्वप्निलपणात त्या कधीं गेल्या हें कळलेंच नाहीं. आणि शेवटीं एकदम जाणीव झाली ती कांतानें आपला पदर धरला आहे याची. ' अगबाई ! खरेंच कां दिवस मावळला ? खरेंच कां दिवे विझले ? खरेंच कां सामसूम झालें ? आणि इथें एकटीच. आतां येत हवेसें आणि नकोसें बोलणारी सखी कधीं बरे हळूंच निघून गेली ? हे आत आले तेव्हां मला कसें कळलें नाहीं ? मी कसल्या तंद्रींत होतें ? हिनें दरवाजाहि हळूंच लावून घेतला वाटतें. आतां मी काय करूं ?'

" आणि हें असें मला काय वाटत आहे ? यांनीं तर नुसता शालूचा पदर धरला आहे. पण तो का सजीव झाला आहे ? यांच्या अंगुलींतून निघणारी वीज का या धाग्याधाग्यांतून पसरून माझ्या सर्वांगाला झिणझिण्या आणीत आहे ? मला का सुया टोंचत आहेत ? कीं हिमकण स्पर्शत आहेत कीं अग्नीचे अंगार डसत आहेत ? मला होत आहे तरी काय ? हेंच तें कांहीतरी नकोसें आणि तरीही हवेंसें वाटणारें. हें सहन होत नाहीं तरी आणखी हवेसें वाटत आहे. हे मंचकावर बसले होते. मी दूर उभी होतें. मी इतकी यांच्याजवळ कशी आलें ? कधीं आलें ? इश्श ! "

आणि लाजून तिनें मान वळविली. नवा पदराला स्पर्श करणारा हात आतां अंगाला पोचत होता. पण लाजरीनें आपली पानें मिटून घ्यावी तशीं तो स्पर्श होतांच अंगीं अंगीं संकोचलीं. लज्जेनें अवयव अंगातच जिरून गेले. साऱ्या शक्तीच बधिर झाल्या. कांत कांहींतरी विचारीत होता तें ऐकूं येईनासें झालें. ती कांहीतरी बोलत होती पण शब्द फुटतनासे झाले. मुलखाची मेली लाज वैरीण झाली. हुरहूर लोपली. लाज मळावली. जसें होऊं नये असें वाटत होतें तसें होऊं लागलें. कान्तानें आलिंगन द्यायचा प्रयत्न केला तेव्हां तिनें अंगोंच आंखडिली. कांतानें चुंबनासाठीं मुख वळविलें तेव्हां तिनें हातानें

निवारलें. त्यानें विचारलेल्या कितीतरी प्रश्नांना तिनें काय उत्तरें दिलीं हें तिचें तिलाच कळलें नाहीं. आणि हा प्रथम परिहास असाच संपला. कांहींतरीच झालें असें तिला वाटलें. आपण आपल्या मुरब्बी कांताला आपल्या सपत्नींपेक्षां अधिक रमविलें आहे हें बापुडीला कळलेंच नाहीं.

पण सारे दिवस का असेच रहाणार होते ! आपल्या महालांतील शयनाची वाट तिला हळूहळू सखीच्या मदतीशिवाय मिळूं लागली. आवाज केल्याशिवाय तिला दार बंद करतां येऊं लागलें आणि हें कधीं झालें तें तिला कळलेंच नाहीं. आपण होतों कुठें, आलों कुठें, हेंही तिला कळलें नाहीं. ही पहा. ती शयनांत आली आहे. आणि नेहमी रात्र जागविणारा तिचा कांत आज आधींच येऊन झोंपला आहे.

'अगदीं गाढ. किती घट्ट मिटलेले हे डोळे ! झोंपेंत का डोळे इतके घट्ट मिटतात ! किती तालावर चाललेला हा श्वास ! श्वास का इतक्या तालावर चालतो. मला माहितच नव्हतें. पण ही का झोंपायची वेळ ! आतां मी करूं तरी काय गडे ! काय करूं ! दिवा मालवूं आणि झोपूं ! सखीनें दिवसभर झोंपविलें आहे. आता झोप थोडीच येणार ! आणि दिवा मालवून अंधारात भीति वाटली तर ! असूं दे. असूं दे दिवा. मी अशीच यांच्याकडे पहात बसतें. नाहींतरी डोळे भरून पहायला वेळ आहे कुठें ! दिवसा लोकांची धांदल. रात्रीं यांची धांदल. आतां बरी सांपडली स्वारी. किती सुंदर हें रूप. किती सुंदर हें वदन. किती सुंदर हे ओठ–हे ओठ–हे ओठ...'

आणि तिला एकदम कसेंसेंच होऊं लागलें. कांतानें कसून अनुनय केला असतांही अनुरागाचें उद्दीपन होत नसे तसें उद्दीपन सुप्त कांताचे ओठ एकांतांत पाहून झालें. प्रेमाचा आवेग सरसरला. एकदां चहूबार नजर टाकून ती खालीं वांकली.



'यांचा श्वास माझ्या ओठांना जाणवला. माझाही श्वास यांच्या ओठांना जाणवेल का ! याची झोंप मोडेल का ! मी श्वास बंदच करते. त्यांचे ओठ किंचित उंचावले कीं काय ? छे ! भास ! झोपेंत का ओठ उंचावतात ? घेऊं का ? घेऊं का ? अगदीं हळूंच ! कापसासारखें ! वाऱ्याच्या झुळकीसारखें ! स् ! अरे ! तरीही यांना कळलेंच वाटतें ! यांच्या सर्वांगावर रोमांच तरळले. म्हणजे यांनीं का खोटेंच झोपेचें सोंग आणलें होतें ? इश्श ! यांनीं तर मला कवळलेंच कीं ! काय हा चावटपणा ! इश्श ! कुणी पाहील...कुणी ऐकेल–'

'किती ही धिटाई ! तुझ्या कंचुकीवर विणलेले मोर किती रेखीव आहेत म्हणे ! आणि असले मोर रेखीव. तर ते डोळ्यांनीं पहायचे असतात कीं अंगुलीनें चांचपायचे असतात ? आणि ही कंचुकी विणणारी सखी तरी बरीच दिसते. मोराची चोंच का इथें विणतात ! मोर द्राक्ष खात असल्यासारखें दिसत आहे म्हणे. आणखीं नाहीं ना कांहीं दिसत ! आणि दिसतें तें डोळ्यांनीं बघा ना. चावटपणा कशाला ! करा काय हवें तें. मी तिकडे पहातच नाहीं. म्हणजे झालें. अंधानें मोर चांचपावा तसे चांचपत हे आतां मोराच्या पायांशीं आले. सुटलें एकदाची. पण हें काय ! यानी तर कुंचुकीच्या गांठीसच हात घातला कीं...मी या गोष्टी कशा सहन करीत आहे ! यांना दूर लोटून टाकावयास माझे हात पुढें सरसावत नाहींत !'

आणि तिला वाटतें वक्षस्थलाच्या रूपानें सारी लज्जाच उघडी पडली. त्याची धीट नजर तिला सहन होत नाहीं. ही नजर कशी टाळावी या गोंधळांत ती आपलें वक्षस्थल त्याच्या छातीवर टेकवून त्याच्या नजरेआड करते. तिला दुसरा मार्गच दिसत नाहीं. तो काहींतरी बोलतच असतो. तो म्हणतो, 'पहा. तूं असें आलिंगन दिल्यानें तुझ्या स्तनमंडलास लावलेला चंदनलेप सुटून शयनावर पडला. त्यामुळें हें शयन फार खरबरीत झालें. हे कोमलांगी आतां तूं झोपणार तरी कुठें आणि कशी ? त्यापेक्षां तूं माझ्या छातीवरच झोंप ना ? आणि शयनाची मृदुता कुठें लोपली, चंदनचुरा कुठें पडला हें तिला नीट कळावयाच्या आतच त्यानें तिला आपल्या मिठींत ओढून घेतलें. तिला तर चंदन आणि शयन असल्या गोष्टींची जाणीवच लोपल्यासारखें झालें. तिला कळत होता एक आनंद. आनंद. अजून अपुरा वाटणारा आनंद. त्या आनंदाची धुंदी तिला चढली. तिची शुद्धबुद्ध जणूं लोपली. आपल्या पायाच्या अंगठ्यानीं ओढून त्यानें तिच्या अंगावरचें झुळझुळीत रेशमी वस्त्र कधीं दूर केलें तेंही जणूं तिला कळलें नाहीं. उलट तिला जाणवत होती वस्त्राची उरलेली गाठ. नकोशी वाटणारी गांठ. बिचारी उगीच उतावीळ झाली होती. रेशमी वस्त्राची गाठ निसटायला कठीण नसतें याचा तिला अनुभव नव्हता.

"ही मला कसली संवेदना होत आहे ! हिची जाणीव करून घ्यावयास मेंदूची तरलता थिटी पडत आहे. अयाई. काय हा आवेग. आलिंगन इतकें का दृढ देतात ! अशानें माझें वक्षस्थळ आतच जिरून गेलें तर मी काय करूं ? हें काय माझ्या अंगावरची लव उभी राहिली आहे. मला लज्जा अधिक वाटत आहे, कीं सुख अधिक वाटत आहे, कीं वेदना अधिक प्रखर आहे ! मी नको–नको असे शब्द बोलत आहे ते माझ्या मुखांतून निघत नाहींत काय ! की निघत असले तरी यांना ऐकूं येत नाहींत ! कीं ऐकूं येत असले तरी यांना कळत नाहींत ! कीं कळत असूनहि हे लक्ष देत नाहींत ! नकोशी वाटणारी ती वस्त्रगांठ आहे कुठें ! आणि वस्त्र तरी कुठें आहे ! मला आतां हें सहनच







अनुक्रमणिका

होत नाहीं. नको रे, नको रे असें सांगूं तरी किती वेळ ? आतां मला सांगावयास अवसान नाहीं. मला धांप लागली आहे. माझा श्वास कोंडत आहे. मला हें असह्य होत आहे. मी कुठें आहे ? मी कुठें आहे ? मी आतां मरणार. मी मेलें. मी इथून निघालें. तरल झालें. संवेदनांच्या महौघावर मी तरंगलें. मी हें सुख सांहू शकत नाहीं. माझी संवेदना लोपत आहे. माझे नेत्र मिटत आहेत–मिटत आहेत.'

आणि आनंदाच्या अतिरेकानें तिच्या चेतना मंदावतात. प्रभातकालीन मुकुलित इंदिवराप्रमाणें तिचीं लोचन युगलें मिटतात. उन्मत्त हंसानें चंचुघातानें विशीर्ण केलेल्या कोमल मृणालिनीच्या किसलयाप्रमाणें तिचीं परिक्लांत अंगें अचेतनता पावतात. निद्रेनें तिला आपल्या पांघरुणांत घेतलेलें असतें. मधूनच तिची निद्रा चाळवते तेव्हां तिचे ओठ हालतात आणि अस्फुट शब्द निघतात, 'नको. नको. मेलें मेलें.'

कितीहि गाढ निद्रा असली तरी कुलवधूनें सर्वांआधीं उठायचें असतें. माउलीचे संस्कारच असे असतात. ते पाळण्यास मदत करणारी सखी असते. पण सखी येण्याअगोदरच ती उठते. कुठें तरी पडलेल्या वस्त्राची आपणास इतका वेळ शुद्धच नव्हती हें पाहून तिला शरमेनें मेल्यासारखें होतें. निघून जातांना कांतानें तें अंगावर घातलें नाहीं म्हणून तिला राग येतो. सखीनें अशा अवस्थेमध्यें आपणास पाहिलें नाहीं, याचें तिला समाधान वाटतें. सखीपासून गुप्त कांहींच नसतें. रोज स्नान तर तीच घालते. पण ती विवस्त्रता वेगळी आणि ही वेगळी.

अंग जडावलें आहे. कुठें तरी वेदनाहि होत आहेत. उठूं नयेसें वाटत आहे. पण उठावयासच हवें. सासूसासऱ्यांना वंदन करावयाची वेळ टळून चालणार नाहीं. इतर सवती नमस्कार करून गेल्या; हीच मागें उरली तर आईला नांवें ठेवलीं जातील. उभय कुळांच्या अब्रूस जपावयास हवें. ती उठते तेवढ्यांत सखी येते. वेणी फणी होते. स्नान–प्रसाधन करतांना सखीच्या चेष्टेस ऊत येतो. पण ती तिकडे लक्षच देत नाहीं. कशीबशी घाईघाईत ती गुरुदर्शनाची वेळ साधते. जरा उशीरच झालेला असतो. सवती आशीर्वाद घेऊन गेलेल्या असतात. नमस्कार करण्यासाठीं वांकून त्यांनीं भूमीवर टेकलेल्या अंजलींच्या खुणा अजून असतात. नववधू येते. गुरुजनांसमोर वांकते. आपल्या हालचालींत अवघडलेपणा नसावा म्हणून ती प्रयत्न करते. पण तो असतोच. अंतःकरणांतील प्रसन्नता नितान्त आदरामधें परिणत झालेली असते. ती आदरानें गुरुजनांच्या चरणांना शिवते. जशी कीं देवपूजा.

या पूजेला मंत्राचीच उणीव असते. ब्राह्मणांनीं वेदघोष करावा तसा तो मंत्र उच्च आणि स्पष्ट स्वरांत ऐकूं येतो,

"नको. नको. आतां पुरें. मेलें मेलें. नको नको. आतां पुरें. मेलें. मेलें.'

तिनें माहेराहून आणलेला लाडका बुद्धिमान पोपट तिच्यामागून उडत आलेला असतो. आपण रात्रीं शिकलेला नवा पाठ गुरुजनांस दाखवावा म्हणून तो ओरडत असतो, 'नको. नको. आतां पुरें. मेलें. मेलें.'

क्षणभर पोपट काय म्हणत आहे तें तिला कळतच नाहीं. दांपत्य रहस्यांत रात्रीं बोललेले बोल दिवसा पुष्कळदां परके वाटतात. पण कौतुकानें भरलेली सासू-सासऱ्यांची नजर पोपटावर आणि आपणावर आळीपाळीनें फिरत आहे हें दिसतांच तिला प्रकाश दिसतो.

तिच्या पायांखालची भूमि सरकते. तिचे पाय खंचतात. सासूनें खांद्या-वर ठेवलेल्या हातांतून प्रेमाचें आश्वासन मिळतें म्हणूनच ती पडावयाची रहाते. कशीबशी ती परत जायला निघते. जातांना पोपटाला पकडून त्याच्या तोंडांत ती आपला अधर देते. निदान वाटेंत तरी त्याचा शहाणपणा नको. आणि त्यानें शहापणा केलाच, तो बोललाच, तर निदान त्याच्या चोंचीतील तो ओंठ तरी शिक्षा पावो. असले जीव घेणारे आणि अश्रू घालविणारे शब्द बोलणारा ओठ.

ती आपल्या महालांत जाऊन पोपटाला नाजूक चोप देते. किती विपरीत ! झटकन पाठ गिरविल्याबद्दल शिक्षा मिळावी कीं बक्षीस ! जाऊ द्या. बायका चंचल असतात. आणि या चंचल बायका मोठे दृढ असे निश्चयही करीत असतात. पुन्हा म्हणून या पोपटाला सुटा सोडाव-याचा नाहीं. पुन्हां म्हणून 'नको नको' म्हणावयाचें नाहीं. नको म्हणावयाचें नाहीं याचा अर्थ हवें म्हणावयाचें हा तिच्या लगेच ध्यानांत येतो आणि तिचे गाल लाल होतात. तिला गंमत वाटते. ती हळूंच म्हणते, 'आणखी, आणखी.' तिला भीती वाटते. हे शब्द सखीनें ऐकले तर नाहींत ना ! ती सखीकडे पहाते. पण सखी कसल्यातरी कामांत गुंतलेली असते. 'इश्श ! अरसिक मेली.'

आणि मग त्या रसिकेचे दिवस भुरभूर जातात. शरीर-पिंडानी मुक्त सोडलेलें चक्र एक वर्तुळ पूर्ण करतें. नववधू रजस्वला होते. आज सखीच तिच्या जवळ झोपणार हें ऐकून तिला संकट वाटतें. आणि त्या संकटाचें खरें स्वरूप वेगळें असतें. तिला तिचाच असा वाटत असलेला कांत आतां सपत्नीकडे जाणार असतो.



आणखी कांहीं पाळीव प्राणी...!

नववधूच्या नवथर नव्हाळींत गुंगलेला तो भृंग आतां मुरलेल्या मद्याची मादक माधुरी चाखावयास जाणार असतो. नववधूची नववधुता संपून तिला सपत्निता येणार असते. यापुढें आपलें स्थान तिला ईर्ष्येनं टिकवावयाचें असतें. आपल्याकडे आलेला कांत हा सपत्नीच्या शयनांतून उठून आलेला आहे या घृणास्पद जाणिवेवर आपटून जीवन उध्वस्त होऊं न देतां, ती घृणा पचवून, तिच्याशीं मिळतें घेऊन सवतीच्या उरावर बसण्यांत ती यशस्वी होणें जरूर असतें. त्याचें तंत्र या नववधूला शिकवायला हवें. त्यासाठींच तर सखी असते.

तीन दिवस सारखे धडे चालू असतात आणि परीक्षेचा समय उगवतो. चवथ्या दिवसाची पहाट. या वेळीं तो स्मरण ठेवून तिच्याकडे आला तर तिच्या जीवनाची सुरुवात ठीक झाली, भविष्य आशादायक आहे असें ठरणार असतें. सखी या जाणिवेनें गंभीर झालेली असते. पण जगाची ओळख नसलेली नववधू मात्र उत्कंठित झालेली असते. आपल्या उपदेशावर पाणी पडलें आहे हें सखी ओळखते. पण धीर सोडून चालणार नसतें.

सारखी चंद्रावर डोळे लावून बसलेली नववधू चंद्रानें मध्यरात्री-पर्यंतचें अपेक्षित अंतर क्रमण्यास घटकाभर असतानांच घाईला येते. 'रात्र उलटली. रात्र उलटली. चल आंघोळ घाल. ते आतां येतील.'

ते आतां येतील, या ध्यासामध्येंच आंघोळ प्रसाधन होतें. 'उतावीळ होऊं नकोस. एकदम वश होऊं नकोस. ओढून धर. त्रागा कर. नाकदुऱ्या काढावयास लाव' असे सखी सांगत असते. एकीकडे हो हो म्हणत म्हणत ती सखीला सुचवितें कीं तिनें त्याच्या दासीस भेटून त्याला स्मरण देववावें. सखीची उद्विग्नता तिच्या ध्यानींहि येत नाहीं. आतां हिला काय सांगावें याचा विचार सखी करीत असते तोंच त्याची चाहूल लागते. एक संकट टळलें असा समाधानाचा निश्वास टाकून सखी निघून जाते आणि कांत प्रवेश करतो.

अंधुक प्रकाशांत दुरूनच तिला सारें स्पष्ट दिसतें. सपत्नीच्या नयनाचें काजळ त्याच्या ओठाला लागलेलें असतें. सपत्नीच्या ओठाचा रक्तिमा याच्या गालाला लागलेला असतो. त्याच्या छाती-वरच्या अंगरागावर तर केवढीं मोठालीं दोन वर्तुळें एकमेकांत मिसळून उठलेलीं असतात.

तिच्या नयनापुढें अंधेरी येते. हृदय चर्रकन सुरीनें चिरल्यासारखें वाटतें. याच प्रसंगासाठीं सखीनें शिकविलेलें सारें विस्तृत नाट्य पार विस्मृत झालेलें असतें. हृदयाचा गोळा बनून तिच्या कंठांत येतो. आपला तोल गेलासें तिला वाटतें आणि ती मंचकाचा खुर धरून त्यावर डोकें टेकते. दुःखाशीं विचारपूर्वक सामना देण्याची तिची मुळींच तयारी नसते. सर्व दुःखांवरचा एकच निरागस उपाय तो तिच्या साहाय्यास उभा रहातो. अश्रू–अश्रू–अपाप अंतकरण ढवळून निघालेले दुर्बल अश्रू, तिच्या इन्दीवरासारख्या लोचनांचे कांठ पाण्यानें डबडब-तात. ओंठ चावून त्यांना आवर घालण्याचा प्रयत्न केला तरी त्यांचे सरसरून पतनशील असे टपोरे अश्रू बनतात. नेत्रींचें सगळें काजळ धुवून ते गोबऱ्या गालांवर उड्या घेतात आणि तिथून तिचा कपोल-राग धूत धूत तिच्या वक्षस्थलांवर ओघळतात. दुःखाची समोरासमोर भेट होतांच सारे पढीक पाठ निकामी झालेले असतात.

आजवर असे अनेक जणींचे अश्रू प्यालेला कांत मुळींच डग-मगत नाहीं. त्यानें तिला पाठमोऱ्या अवस्थेंतच दृढालिंगन दिलेलें असतें. कुपित हरिणीला शांत करण्यासाठीं हरिणानें आपल्या शिंगानें

अनुक्रमणिका

तिला हळूहळू खाजवावें तसें तो आपल्या ओठांनी, गालांनी, नासिकेनें तिच्या केशमूलामधें सुखद गुदगुल्या करून तिला हुळहुळी आणीत असतो; आणि आलिंगित अवस्थेमधेंच तिला आपल्या सन्मुख करतो. पण तिची नजर अजून खालींच असते.

तिला नवल वाटतें. "त्याच्या छातीवर दिसलेल्या त्या सपत्नी कुचमंडलाच्या खुणा कुठें आहेत! तिथें तर आपल्याच मोकळ्या केसांच्या खुणा आहेत. हें काय नवल! कीं आपणास भास झाला! ओठांना काजळ लागलेंसें वाटलें होतें. आहे कुठें? गालांना लाली कुठें आहे! कीं आपणास भ्रम झाला! खासच. सखीनें सारखें सारखें तेंच तेंच पढविल्यामुळें आपणास दुसरें कांहीं सुचतच नव्हतें. त्यामुळेंच हा भ्रम झाला. पण ती तर म्हणाली होती, 'सांभाळ. सांभाळ. तो धूर्त कांहींतरी नजरबंदी करून तुला फसवील. फसूं नकोस. सैल सोडूं नकोस' मग आतां कसें करूं?" तिच्याच पदराला कांतानें साऱ्या खुणा पुसल्याचें तिला कळलेलें नसतें.

ती गोंधळांत पडते. सखीच्या वक्रोक्ति तिला आठवतात. एकादा पढीक पोपट बोलावा तशा त्या साऱ्या उक्ति ती भराभर बोलून टाकते. तिला कृतकृत्य वाटतें. अपराधी असलाच तर या कांताला आपण अनन्यसाधारण असा दंड करून जन्माची खूण घडविली असें तिला वाटतें आणि आतां सखीचें बोलणें रहाणार नाहीं अशी खात्री पटून ती आपले मनोरथ पूर्ण करून घेण्यासाठीं कांताच्या स्वाधीन होते.

नववधू यावेळीं फसते. पण तिच्या मनांत संशय आलाच आहे. या संशयांतून तिचें मुग्धत्व लोप पावणार आहे. आणि तिच्यांतून कामकलानिपूण ईर्षावती अशी वेगळी नायिका बनणार आहे.

लेखाच्या आरंभी जो श्लोकपद दिला आहे त्याचा अर्थ होतो, 'मुग्धतेनें विनटलेल्या प्रेमाचा हा प्रकार किती अनिर्वचनीय सुंदर आहे बरें' असे अनिर्वचनीय सुंदर प्रेमाचे प्रकार ज्या अमरूशतकामध्यें आहेत त्याचा कर्ता अमरू हा कोण याचा पत्ता नाहीं. दंतकथा अशी आहे कीं ही रचना जगद्गुरू आद्य शंकराचार्य यांची होय. शंकराचार्यांचा मंडणमीश्राशी वाद चालू असतां, मंडणमीश्राची पत्नी शारदा हिनें त्यांना कामशास्त्राचे प्रश्न विचारून अडविलें. तेव्हां शंकराचार्यांनीं तिच्याकडून मुदत मागून घेतली आणि योगविद्येनें अमरू या मृत राजाच्या शरीरांत प्रवेश करून त्याच्या मनोरमा अशा असंख्य पंकजाक्षी कांताकडून कामशास्त्राचे सक्रीय पाठ घेतले आणि नंतर शारदेचा पराभव केला. त्या रूपांतरित जीवनांत शंकराचार्यांनीं ही शृंगारिक रचना केली अशी दंतकथा आहे.

शंकराचार्यांची अलौकिक विद्वता आणि कवित्वशक्ति, अमरूशतकच काय पण जगांतील कोणतेंहि काव्य लिहिण्यास समर्थ होती. पण तरीहि त्यांनीं हें काव्य लिहिलें असें मानणें म्हणजे त्या जगद्वंद्य संन्याशाची अघोर विटंबना होय असें मानणारा एक पक्ष आहे. त्या पक्षाचें मत सुबुद्ध माणसास पटावयास हरकत नाहीं. दुसऱ्या पक्षाचें म्हणणें ही रचना शंकराचार्यांचीच असून त्यांत शृंगार मुळींच नाहीं. केवळ वेदांत आहे. या लोकांनीं अमरू शतकाचा वेदांतपर अर्थ लावण्याचा भयानक खटाटोपहि केला आहे. या खटाटोपाचें वर्णन टीकाकारांच्या शब्दांत करावयाचें म्हणजे (रहसि प्रौढवधूनाम् रतिसमये वेदपाठ इव शिरःशूलम् जनयति) हा खटाटोप कामकलानिपूण वधूसह एकांतांत रतीचें आसन घातल्यावर तिनें एकदम वेदपाठास सुरवात करावी त्याप्रमाणें रसिकांच्या डोकेंदुखीस कारण होतो.

वरील लेखांत अमरू शतकाचें भाषांतर दिलेलें नाहीं. तर अमरूशतकांतील ४, १६, १७, २६, ३५, ४०, ४१, ४८, ७४ हे श्लोक आणि त्यावरील रसिकसंजीवनी टीका यांच्या आधारें एकसंध प्रबंध लिहिण्याचा प्रयत्न आहे. गूण पूर्वकवींचे आहेत आणि दोष माझे.

●●●















अनुक्रमणिका

*ती लगबगीनं चाललेली दिसताच त्यानं तिला थांबवलं. दाट पानाच्या संभारांत हिरव्या चांफ्याचं फुल दडलं असावं तसं स्मित तिच्या ओठांवर फुलून गेलं.. पण दुसऱ्याच क्षणीं...*

एक दिवस तो तिला अगदीं अचानक रस्त्यांत भेटला. एका रात्र फासलेल्या संध्याकाळी! ऐन भरांतले सारे रंगबेरंग जसे घातळासारखें कपाटांत ठेवले होते. वैराग्याची भगवी छटा सुद्धां आकाशानं झाडून टाकली होती. चुकूनही, दुरून सुद्धां लाल–पिवळ्या रंगाची सावली नको... भस्मांचे पट्टे ओढावेत तसे तिच्याही कपाळावर कसल्या सजड तत्वज्ञानाचें बळ होतें. दुडक्या चालीला वजनदार प्रौढ लय होती.

संथ, बोजड नजर! कांहींच बघण्यासारखं न उरलेली–!

तो मात्र होता तसाच! गेल्या वीस वर्षांत त्याच्या चालण्या–बोलण्यांतसुद्धां कांहींही फरक पडला नव्हता. फक्त केसांत मध्येंच पांढऱ्या छटा चमकूं लागल्या होत्या. तेंच मिष्किल, प्रसन्न हास्य! तकतकीत गोरा रंग! अमसुली किंचित् जांभळी छटा असलेले उमदे डोळे! भरदार उंच शरीरयष्टी! तसा तो पहिल्या-पासूनच देखणा!

ती जरा लगबगीनं चाललेली दिसतांच त्यानं तिला थांबवलं! अन् त्याच वीस वर्षां-पूर्वींच्या हास्यानं त्याचा चेहरा उजळून निघाला. दाट पानांच्या संभारांत हिरव्या चाफ्याचं फूल दडलेलं असावं, पण सुगंध यावा तसं तें हास्य तिच्या परिचयाचं होतं. वीस वर्षांची पुटं खरवडीत आठवणी येत होत्या. घडी मोडतांना प्रथम लुगड्याचा टोपपदरच पुढें यावा, तशा तरुणपणच्या टोपपदरी लालभडक आठवणी–!

क्षणभर त्यांतच तो गुंगून राहिला.. अभावितपणें त्यानं आपले दोन्ही हात पुढें केले आणि त्याच्या हातावर तिची दृष्टि जातांच एकदम विजेचा झटका बसावा तशी ती मागें फिरली. त्याचे कोपरापासून पुढचे हात कशानं तरी जळाल्यासारखें दिसत होते. एक हात अजिबात कापला होता. दुसऱ्याचं फक्त हाड शिल्लक होतं. अन् ती दोन वांकलेली कुरूप बोटं...!

अंगावर शहारे देत ती पहातच् राहिली.. कोरं करकरीत वस्त्र मध्येंच जळावं तशी तिला खंत वाटूं लागली. हातापायाला घाम फुटला..

## शोक संवेदना !

सौ. इंदुताई साक्रीकर दि. २७ ऑक्टोबर रोजीं अकालीं निधन पावल्या. नुकतीच त्यांनीं 'दीपावली'त लिहायला सुरुवात केली होती. दीपावलीसाठीं कांहीं तरी खास लिहिणार असल्याचेंहि त्या बोलून दाखवीत असत. मराठींतील कथासाहित्यांत आपलें असें एक स्वतंत्र स्थान त्यांनीं निर्माण केलें होतें. स्त्रीस्वभावाची उकल आणि स्त्रीजीवनांतील उपांगांची छाननी अति सूक्ष्म रीतीनें त्या करीत असत. चोखंदळ वाचक त्यांच्या लेखनावर खूष होता.

ऐन दिवाळींत दीपावलीसाठीं त्यांनीं जी सुरेख गोष्ट पाठविली ती त्यांच्या स्मरणार्थ आम्हीं आज प्रसिद्ध करीत आहोंत. बहुधा दीपावलींतील त्यांची ही गोष्ट शेवटची असूं शकेल. त्यांच्या कुटुंबियांच्या दुःखांत आम्हीं सहभागी आहोत. त्यांच्या अकालीं निधनानें मराठी साहित्य-सृष्टि एका हुशार लेखिकेला मुकलेली आहे.

—संपादक



— इंदू साक्रीकर

खमळल्यासारखं देखील होऊं लागलं. त्याची खिळलेली नजर ती टाळूं लागली. पण आपली अशी वागणूक त्याला बोचेल हा विचार मनांत येतांच ती सारं कांहीं विसरून त्याच्याकडे हंसत पाहूं लागली. तो हंसतच होता. आपले थोटके हात तो पूर्णपणें विसरून गेला होता. तिच्या डोळ्यांत आश्चर्य मावेना. तेंच प्रसन्न हास्य–अन् तेंच थोटकं हस्तांदोलन–! स्वतःच्या लहानपणाची तिला अगदीं लाज वाटूं लागली. त्याच्या विषयींच्या सहानुभूतीनं मन ओतप्रोत भरलें पण तिची खंत किंवा सहानुभूती त्याच्या लेखी मुळींच नव्हती.

दिलखुलास हंसत तो म्हणाला,

'कां विशेष घाई दिसते आहे? कुठं निघालीस!'

'कुठें नाहीं, घरींच!'

'घरीं कोणी वाट पहात बसलंय वाटतं!'

'नाहीं!'

'मग येतेस. त्या समोरच्या हॉटेलमध्यें. जरा वेळ चहा पीत बसूं! कां फिरूं या?'

'कसंही चालेल!'

'बाकी बऱ्याच दिवसांनीं भेटलीस अशी! नाहीं? चांगली दहा–पंधरा वर्षे तरी झाली असतील!' मान पुढें वांकवीत तो अगदीं खुषीत येऊन म्हणाला–'मग फिरूं याच आपण! बसून काय राहयचं नुसतं!'

'पण जायचं कुठें! चालतच ना!'

'छे छे! गाडी आणली आहे ना!

कालच गांवाहून आलों. उद्यां तुझा पत्ता शोधणार होतो, तोंच तूंच आज अशी अकस्मात भेटलीस!' तो खूप मोठ्यांदा हंसला आणि गाडीजवळ जाण्यासाठीं रस्ता ओलांडूं लागला.

तिनं गोंधळून विचारलं, 'पण गाडी चालवणार कोण!'

'हात वेडे! दुसरं कोण माझ्याशिवाय! बघ तर खरी! ह्याच हातानं कसं ड्रायव्हिंग करतो ते!' कोते हात हे त्याचं जसं कौतुकच झालं होतं...एखाद्या प्रिय माणसाचं वर्णन करावं तसं आपल्या हातांचं चीज करीत तो गाडीत बसला, आणि अगदीं बेदरकारपणें गाडी चालवूं लागला. इतक्या सफाईनं कीं कुणाला त्याच्या हाताबद्दल सांगितलं असतं तरी खरं वाटलं नसतं. त्या भरधांव वेगाची तिला एकसारखी भीति वाटत होती. तो मात्र तिच्या वेडपट भीतीला हंसत मुद्दाम वेग वाढवीत होता. वाढलेल्या वयाच्या निमुळत्या उतारावरून धांवपळतच खालीं उतरत होता. आपलं वीस वर्षांपूर्वींच तरूणपण इथेंच कुठं–तरी कडेला झाडपाल्यांत जसंच्या तसं राहिलं आहे अशा लालसेनं!

'किती वेगानं गाडी चालवतोस रे!'

'त्याला काय झालं! पूर्वीं सुद्धां आपण असेच फिरायला गेलों असतों तर फार बरं झालं असतं!' अगदीं बेपर्वाईनं तो बोलून गेला.

मग बऱ्याच वेळांनीं त्यानं अलीशान हॉटेल समोर गाडी थांबवली. कांचा बंद करून खालीं उतरण्याच्या गडबडींत नकळत त्याच्या वांकड्या तिडक्या बोटांचा तिच्या खांद्याला स्पर्श झाला. तिला कसं तरीच वाटलं. त्याच्या त्या काटकीसारख्या बोटांची किळसही आली आणि दयाही वाटली. शहाऱ्यांनीं अंग ताठ करीत त्याच्यापासून दूर होत ती खालीं उतरली.

हॉटेलमध्यें शिरतांच सर्वांचं लक्ष एकदां त्याच्या हातांकडे एकदां तिच्याकडे खिळत होतं. एका कोपऱ्यातल्या टेबलाशीं तीं दोघं बसली. वेटर जवळ आला तोही हाताकडे नाक मुरडून पाहूं लागला.

पण ह्या साऱ्या कुतूहलाकडे त्याचं यत्किंचितही लक्ष नव्हतं. जसं कांहीं कांहींच झालं नाहीं, अशा थाटांत त्यानं वेटरला ऑर्डर दिली. तिच्याकडे एकदां टक लावून पहात म्हटलं, 'बाकी फार वर्षांनीं भेटलीस हं!'

'हं!'

'तुझ्यांत तसा बदल कांहींच झाला नाहीं. मला वाटलं खूप बदलली असशील!'

'तुझ्यांतही कांहीं बदल नाहीं!'

'हा नाहीं कां बदल!' त्यानं अगदीं मोकळं हंसत आपले दोन्ही हात तिच्यापुढें धरले तेव्हां पुन्हां एकदां शहाऱ्यानं तिचं अंग फुलून गेलं.

'तुला माहीत आहे कीं नाहीं ह्या हातांची कथा–!'

'थोडीशी कळली होती–पण फारच उडत उडत–!'

'मागल्या युद्धाचा प्रसाद आहे हा बाईसाहेब–! नशीब हातावरच निभावलं.' तो अगदीं खिदळत सांगत होता. पण ती उगीचच खंतावून सुस्कारे सोडीत होती.

'पण खरं सांगूं!' समोर आणलेल्या क्रीमभरल्या टोस्टचे हातानं दोन तुकडे करीत तो म्हणाला, 'ह्या थोटक्या हातानं फार फार शिकवलं मला–!'

'म्हणजे!'

'स्वतःच्या मर्यादा समजूं लागल्या!'

'मी नाहीं समजले!' त्याच्याकडे बारकाईनं पहात ती म्हणाली.

आतां त्याची हास्यानं खळखळणारी दृष्टी जरा स्थिर झाली. उसळणारा वेग किंचित्

बाजूला झाला आणि आंतले दगड क्षणभरच लकाकून गेले. त्याचं वैराण आयुष्य...! प्रश्नार्थक मुद्रेनं ती नुसती पहात राहिली...तो गडबडीनं म्हणाला, 'जाऊं दे तो विषय–! मला नाहीं सांगता येणार तसं !'

इतक्यांत चहा समोर आला होता. चेहेऱ्यावर श्रमांचंच अवसान आणीत त्यानं कपांत चहा ओतला. जरा नाखुषीनंच तिनं कप उचललेला पाहून तो म्हणाला, 'हाताचा फार विचार करायचा नाहीं. हें मला एका नर्सनं शिकवलं–!'

'नर्सनी–!'

'हो ! हा अपघात झाला तेव्हां मी इटलीत होतो. सगळे जखमी सैनिक स्वदेशी निघून गेले होते. मीच काय तो एकटा मागे उरलो होतो. मी हट्ट घेतला कीं माझ्या हातावर इथेंच उपचार झाले पाहिजेत. तो माझा हक्क आहे. मला एकट्याला मोठ्या इतमामानं लंडनला आणण्यांत आलं. एक हात चक्क कापून लाकडाचा बसवण्यांत आला !'

'मग !' ती मध्येंच म्हणाली.

'त्या हॉस्पिटलमधल्या नर्सेस् मोठ्या प्रेमळ अन् समजुतदार होत्या. मला वाटत असलेली हाताची लाज एकीच्या लक्षांत आली. तिनं एक दिवस मला अगदीं खडसावून विचारलं, 'किती दिवस तुझ्या ह्या हातांना अस्पृश्यासारखं वागवणार आहेस !'

सहासात महिन्यांनीं मी परत इथें आलों तरी तिची ती जळजळीत नजर–आणि ते शब्द मी विसरणार नाहीं. तो लाकडाचा हात मी लांब फेकून दिला आणि हे हात जसें कांहीं औषधासारखें गिळून टाकले !'

एका दमांत त्यानं हें सारं बोलून टाकलं. तेव्हां त्याला किंचित धांप लागली असावी असं तिला वाटलं. त्याचे ते जांभळे हंसरे डोळे उगीचच काळवंडून कुठेंतरी अदृश्यांत स्थिर झाल्यासारखें वाटले. एव्हाना चहाही पिऊन झाला होता. बऱ्याच वेळानं कुठेंतरी रुतून बसलेली जड नजर त्यानं तिच्याकडे खिळवली आणि आळसावत तो म्हणाला, 'तूं माझ्या बायकोला पाहिलं आहेस ?'

'एकदांच ओझरतं ! तुझ्या लग्नांत. मी इथें नव्हते. कशी आहे ! छान आहे कीं नाहीं तुझ्यासारखी !'

'सांवळीच पण छान !' त्यानं एक लांबलचक सुस्कारा सोडला आणि तिऱ्हाईतपणें मान हलवीत तो वरकरणीं हंसत म्हणाला,

'आजारी असते अलीकडे !'

'कां !'

'कोण जाणे–! असेल वय !

'तुला किती मुलं !'

'एकच मुलगी ! तिचं सुद्धां लग्न झालं आताच !'

कां कोण जाणे ह्यापेक्षां त्याच्या खासगी आयुष्याची जास्त चौकशी करूं नये असंच तिला वाटलं. ती कांहींतरी दुसरा विषय काढणार इतक्यांत तोच संथपणें म्हणाला,

'किती वेळां वाटायचं ! तुझा पत्ता काढावा, पत्र पाठवावं–!'

'मग !'

---

**वाचण्याकरितां म्हणून एक पुस्तक मागावयास आलेल्या आपल्या शेजाऱ्याला, कपाटांतून एक नवीन पुस्तक काढून दाखवत वामनराव म्हणाले, 'ह्या ग्रंथांत एक विशेष गोष्ट सांगितली आहे आणि ती ही कीं, हें पुस्तक दुसऱ्या कुणालाहि वांचावयास देऊं नये.'**

---

'एकतर मला लिहिता येत नाहीं. दुसरं हात नाहींत. अन् तुला लिहायचं पत्र काय बायकोला लिहायलं सांगायचं !'

'त्याला काय झालं. !'

ती सहज बोलून गेली. पण त्याचा चेहरा एकदम मावळल्यासारखा झाला. ती भेटल्यापासून आतां प्रथमच त्यानं अगदीं ओशाळलेल्या नजरेनं तिच्याकडे पाहिलं. त्याची खिन्न नजर तिच्या सर्वांगावरून फिरत राहिली. दुसऱ्याच क्षणीं त्यानं वेटरला बिलासाठीं बोलावलं आणि स्वतःला पूर्णपणें कब्ज्यांत घेत तो म्हणाला, 'पण आतां कांहीं हरकत नाहीं. माझी बदली इथेंच झाली आहे. तुला पत्र पाठवावं असं वाटण्याची सुद्धां जरूरी नाहीं आतां. मनांत आलं तर रोजहि भेटता येईल असं !' त्याचा सूर अगदीं ठाम होता. त्या स्वरांत, दृष्टींत, यत्किंचितहि चलबिचल किंवा संकोच नव्हता. सहजपणें आपल्या भावना प्रगट करतांना त्याला कांहींच वाटत नसावं. ती मात्र विलक्षण गोंधळून गेली होती. त्याला म्हणायचं तरी काय हेंच तिला समजेना. साधेच शब्द ! पण त्यांना कसला गंध होता. तिची बावरी नजर त्याच्यावर क्षणमात्र खिळून राहिली. मग नकळत त्याची ओझरती पाहिलेली सांवळी पण सुंदर बायको तिच्या डोळ्यांसमोर तरळून गेली. त्याची न पाहिलेली मुलगी–! दूरवर क्षितिजाच्या रेषेला लगडलेली दाट वनराई दिसावी तसा वाटणारा त्याचा वीस वर्षांचा बहरलेला संसार ! पिकलेल्या फळासारखा तो मधुर नव्हता कीं त्यालाच तारुण्यांतल्या आंबट आठवणींची ओढ होती ? त्याच्या नकळत त्याला बांधून ठेवणारे नाजुक–रेशमी पाश कुठें नकळत उसवून गेले होते कीं...?

तिला कांहींच कळेना. काय बोलावं तेंही सुचेना. ती फक्त वेड्यासारखी पहात राहिली. तेव्हां तोच हंसून म्हणाला, 'माझ्यावर रागावलीस कां !'

'छे !'

'मनांत आलं ! बोलून गेलों. !'

एक दीर्घ उसासा टाकीत तो पुन्हां गाडींत बसला आणि तिच्याकडे एकटक नजरेनं पहात तो म्हणाला, 'खरं सांगूं रागावणार नाहींस ! कां कोण जाणे ! तुला पाहिलं कीं पुन्हां परत हात आल्यासारखे वाटतात !'

भरधांव गाडी सुटली होती. कांहीं न बोलता तो कितीतरी वेळ समोर पहात राहिला होता. तिचं मन–कुठेंतरी पिसासारखं उडत, भरकटत चाललं होतं. अबोलीनं डंवरलेलं क्षितिजही ते पहायला तयार नव्हतं. क्षितिजावर रेंगाळणारा तो गंधखुळा वारा–मघांची ती राखी संध्याकाळही त्यांत कुठें हरवून गेली होती.

तिचं घर आलं तरी तो स्तब्धच होता–शब्द गिळून ! कांहीं न बोलतां ती खालीं उतरली तरी सुद्धां 'अच्छा बाय–!' एवढंच म्हणत त्यानं झटदिशीं गाडी सुरू केली.

ती मात्र जरा वेळ रस्त्यांतच उभी राहिली. त्याची गाडी दृष्टिआड झाली तेव्हां कोपऱ्यावरचा गुलमोहोर तिची दृष्टी अडवूं लागला. अगदीं भकास वठलेला–! त्याच्या वेड्या वाकड्या काटक्या तुटलेल्या हातासारख्या दिसत होत्या. तिला वाटलं–आतां वसंत येईल–तेव्हां झाडाचा हा वेडाविद्रा हात लालीनें रसरसून जाईल ! पण एकदच–फक्त वसंतांत ! मनाला मात्र केव्हांहि, कुठल्याहि क्षणांत, क्षणभर सुद्धां मोहोर भेटून जातो.




*घारूअण्णाला रात्रीं एक स्वप्न पडलं...आणि काय आश्चर्य! म्हाळसाकाकूला आपण मंगळसूत्र बांधण्याऐवजीं तीच आपल्या गळ्यांत मंगळसूत्र बांधाते आहे...आणि आपण...?*



# बायकोची



—प्रभाकर बिःउवे

**पहांटेचे** पावणे सहा वाजले म्हणजे घारूअण्णांच्या अलार्ममध्यें कर्कश आवाजर होतो आणि घारूअण्णांना जाग येते.

जागे झाल्यावर घारूअण्णांनीं कधीं अंग झाडून आळस दिलेला आहे; निद्रानृतीची एखादी दीर्घ जांभई दिली आहे; कृप देहयष्टीची हाडं कडकडून मोडली आहेत किंवा निदान डोळे तरी चोळले आहेत असं कधींच घडत नाहीं. हें सारं करायला त्यांना वेळ असतोच कुठं!

घारूअण्णांना नियमित जागं करणाऱ्या घड्याळावर घारूअण्णांनीं जेवढं प्रेम केलेलं आहे तेवढं त्यांनीं साऱ्या आयुष्यांत कुणावरही केललं नाहीं. म्हाळसाकाकूंना शेजारी उभं करून घारूअण्णांच्या मस्तकावर गांवकऱ्यांनीं मिळून चार अक्षता टाकल्या आणि घारूअण्णांचे दोनाचे चार हात झाले. त्या दिवशीं घारूअण्णांना आभाळ ठेंगणं झालं होतं. एका बायकोचा आपण नवरा झालेलों आहोंत याचा त्यांना केवढा आनंद झालेला होता. रेशिमकाठीं उपरण्याच्या टोकाला शालूच्या पदराची गांठ मारून घारूअण्णांनीं म्हाळसाकाकूसह गृहप्रवेश केला त्यावेळीं शेजारी पाजारी रहाणाऱ्या आयाबायांनीं मिठमिरच्यांनीं घारूअण्णांची दृष्ट काढली; तेवढाच तो परमोच्च आनंदाचा क्षण घारूअण्णांच्या जीवनांत येऊन गेला. नाहीपेक्षां या घड्याळाशिवाय कुणींही एवढी प्रामाणिकपणाची साथ उभ्या आयुष्यांत त्यांना दिलेली नव्हती.

कोनाड्यांतलं तें लाडकं घड्याळ घारूअण्णा हलक्याच हातानं उचलतात आणि नेहमीसारखीच आपली नजर एकवार खोलींत चौफेर फिरवतात.

सारं दृश्य रोजच्यासारखंच असतं.

जिच्याशीं त्यांनीं उभा संसार केला त्या म्हाळसाकाकू निवांत झोपलेल्या असतात. लग्नापासून घारूअण्णा वरचेवर खंगत गेले आणि एखाद्या चिपाडासारखे झाले. पण म्हाळसाकाकू मात्र दिवसादिवसानं अंगानं चांगल्या भरत गेल्या. गांवचे लोक म्हणायचे, 'घारूअण्णा लग्नानंतर प्रपंच्याच्या काळजीनं वाळायला लागलाय आणि म्हाळसाकाकूंना मात्र लग्न चांगलं मानवलय!'

साऱ्या आयुष्यांत म्हाळसाकाकूंनी केवळ खाल्लंच होतं. आणि खाल्लं तेवढं त्यांनीं सारं पचवलं होतं. खुद्द घारूअण्णांनाही त्यांनीं पचवलं होतं. झोपेशिवाय आणि बडबडीशिवाय विशेष महत्वाचं असं त्यांनीं कधीं कांहीं केलेलंच नव्हतं. त्यांची सारखी चाललेली बडबड आणि त्याचं वरचेवर वाढत चाललेलं बाळसं पाहून चाळींतली पोरं म्हाळसाकाकूंना 'बेडकी' म्हणायची. आणि मग घारूअण्णांना मनांतल्या मनांत वाटायचं; 'पोरं म्हणतात त्यांत खरोखरच काय चुकतंय!'

श्वासानं वरखालीं होणाऱ्या म्हाळसाकाकूंच्या छातीवरून घारूअण्णांची नजर मग निसटते आणि जराशी वळते.

दोन्ही पायाची कात्री करून म्हाळसाकाकूंच्या शेजारीच बायडी पसरलेली असते. तिला तशी पहातांच आपणच कात्रींत पक्के सांपडलेलो आहोंत असं घारूअण्णांना उगीचच वाटतं. तशा रामप्रहरांतही त्यांच्या छातीवर कुणीतरी मणामणाचं मोठं ओझं ठेवलेलं आहे असं त्यांना वाटूं लागतं.

प्रपंच्यांत घारूअण्णांनीं अनेक गोष्टी केल्या. ज्या त्यांनीं करावयाला नको होत्या त्या पण केल्या. पण सर्वांत जास्त त्यांनीं या बायडीची काळजी केली.

पहिल्या बाळंतपणांत म्हाळसाकाकू घारूअण्णांपेक्षां अधिक अशक्त झाल्या...असं त्याच म्हणायच्या...आणि दिवसरात्र बाजेवर

झोपून रहायच्या. मांसाच्या त्या इवल्या गोळ्याला दुपट्ट्यांत गुंडाळून घारूअण्णा तासन् तास पोरीच्या तोंडाकडं टुकुटुक् बघायचे. 'विठाबाई विठाबाई' करून स्वतःच रंगायचे. पण पोरीचे पाय पाळण्यांत घारूअण्णांना दिसायला लागले होते. रडायला लागली म्हणजे कार्टी घारूअण्णाना जाम ऐकायचीच नाहीं. घारूअण्णा अगदीं रडकुंडीला यायचे. तिला पाळण्यांत घालून अंगाई गायचे पण पोरीचा आवाज पंचमांत जायचा. आणि घारूअण्णा हवालदिल व्हायचे. म्हाळसाकाकूंचा पहिलाच पारा चाललेला असायचा. घारूअण्णांना वाटायचं पोरीला आईच्या पदराखालीं घालायला हवं. पण कसचं आलंय! त्यांना तसं केवळ वाटायचंच! अशावेळीं शक्य असतं तर पोरीला स्वतःच्या अंगावर पाजायलाही घारूअण्णांनीं कमी केलं नसतं.

बायडी जसजशी वाढत गेली तसतशी घारूअण्णांची काळजीही वाढत गेली. त्यांना वाटायचं, बायडी आईच्याच वळणावर चाललेली आहे.

पुस्तक उघडलं म्हणजे म्हाळसाकाकू म्हणायच्या 'सगळ्या रेघोट्यांचीच गिचमीड केलीय नुसती!' त्या आपल्या केवळ चित्रंच बघायच्या! त्यांत देवादिकांचीं चित्रं दिसलीं नाहीं म्हणजे साऱ्या शिक्षण खात्याचा उद्धार करायच्या.

बायडी रोज पुस्तकं काढून मोठमोठ्यानं वाचते. ती एवढ्या मोठ्यानं वाचते कीं, घारूअण्णांना वाटतं बायडी बहिरी आहे कीं काय कुणास ठाऊक! शेजारचा चंद्या बायडीच्याच वर्गातला! त्यानं कधीं वाचन केलेलं घारूअण्णांनीं ऐकलं नव्हतं. चंद्याची आई घारूअण्णांना म्हणायची, 'अहो, तुमची बायडी वाचते आणि आमचा चंद्या पास होतो.' घारूअण्णांना हिरमुसल्यासारखं व्हायचं पण बायडीला वाटायचं आपलं कौतुकच चाललंय. ती आणखीन मोठ्यानं वाचायला लागते. गल्लींतलीं पोरं तिला 'लाऊड स्पीकर' म्हणतात. घारूअण्णांना वाटतं यांत मुलांचं काय चुकतंय!

बायडी रोज सकाळ-संध्याकाळ दोन दोन तास आरशासमोर बसते. घारूअण्णांना तिचं हें आरशासमोर बसणं अजिबात आवडत नाहीं. पण या बाबतींत पोरीनं आईचाच कित्ता गिरविलेला होता. घारूअण्णा दिवसांत गंध लावायपुरतंच आरशाचं तोंड पहातात आणि महिन्याकाठीं एकदा न्हावी त्यांच्या तोंडापुढं आरसा धरतो तेवढंच! त्यांना वाटतं दोन तपांत जेवढा वेळ आपण आरशासाठीं दिला तेवढा कार्टी एका दिवसांत भरून काढते. हें कांहीं बरं नाहीं. पण घारूअण्णांचं हें वाटणं केवळ वाटणंच ठरतं. बायडीच्या कार्यक्रमांत कधींच बदल पडत नाहीं.

रहातं गांव सोडल्याला घारूअण्णांना दहा अन् तीन तेरा वर्षं झालीं होती. आणि बायडीला आतां नुकतंच सोळावं सुरू झालेलं होतं. घारूअण्णांना तशी अभ्यासांत गति कधीं नव्हतीच आणि म्हाळसाकाकू तर अक्षरशत्रू होत्या. बायडी मात्र यंदा मॅट्रीकच्या परीक्षेला बसायची होती. घारूअण्णांना उगीचच वाटायचं कीं, आपली बायडी गोता खाणार! बायडीचं असलं रोजचं वाचणं, पुस्तकांत वाचलेल्या गोष्टीच पाणी लावून पुन्हां पुन्हां सांगणं, जगांतलं सगळं ज्ञान आपल्याच डोक्यांत आहे ही तिची घमेंड; या साऱ्या गोष्टी पाहिल्या म्हणजे घारूअण्णांना वाटायचं आपल्या बायडीचं मडकं अजून कच्चं आहे. शेजारच्या राधाकाकू म्हाळसाकाकूंशीं भांडतांना बायडीला चक्क 'हाफमॅड' म्हणाल्या होत्या. घारूअण्णांनाही वाटायचं खरंच आपली कार्टी अर्धवटच आहे. म्हाळसाकाकूंच्या फाजील लाडानं शेफारली आहे नुसती!

कच्च्या मडक्याचा विचार डोक्यांत आला कीं घारूअण्णांना वाटायचं आपल्या बायडीचं तोंडही तसंच खापरासारखं आहे. इतका काळा चेहरा त्यांनीं पुरुषाचाही पाहिलेला नव्हता. म्हाळसाकाकू म्हणायच्या 'आपली बायडी सांवळी आहे नाहीं!' आणि घारूअण्णा म्हणायचे 'हो तर; अगदीं तुझ्यावर गेलीय्!' त्यांना वाटायचं, अगदीं गोरी गोरी पान आहे असं म्हटलं तरी ती थोडीच गोरी होणार आहे!

बायडीला जणूं कांहीं गोरेपणाचं वेडच आहे! गोरी गोमटीं पोरं दारावरून चालली कीं, त्यांच्याकडं ती टकाटका बघते. एखादा गोरा पाहुणा घरांत आला कीं, त्याच्या अवतींभवती रहाते. कधीं कधीं तिच्या मनांत एक खंत उभी रहाते. आपल्याला मोठा भाऊ असता तर गोरी गोरी वहिनी घरांत आली असती, असं तिला राहून राहून वाटतं. धाकट्या पंप्यासाठीं गोरी मुलगी बघून ठेवण्यासाठीं तिनं म्हाळसाकाकूंना आत्ताच बजावून ठेवलेलं आहे. दारांवरून वरात चालली तरी नवरा नवरी काळ्या आहेत कीं गोऱ्या आहेत हें ती अगत्यानं पहाते. जणूं त्या गोऱ्या नवऱ्याशीं तिलाच लग्न करायचं असतं आणि गोरी गोरी नवरी ती आपल्या पंप्यासाठींच निवडणार असते. 'गोरी गोरी पान, फुलासारखी छान...' हें गाणं बायडीचं सर्वांत आवडाचं. तें गाणं म्हणत बायडी आपल्या चेहऱ्यावर पावडर फासायला लागली म्हणजे घारूअण्णाला वाटतं हिचा चेहरा खुलून दिसण्यापेक्षां हिच्या काळेपणामुळें पावडरच अधिक सफेद दिसायला लागते. असलं हें ध्यान

## एक आंधळा डोळा



एका संपादकांनीं आपल्या खोलींत एक ब्रीदवाक्य टांगून ठेवलं होतं-'बातमी अगदीं बिनचूक द्यावी' आणि आपल्या प्रत्येक नवीन बातमीदाराला, ह्या ब्रीदवाक्याशीं इमान राखायला ते वारंवार बजावतात.

एके दिवशीं ह्या वर्तमानपत्राच्या नव्या वार्ताहरानं एका सभेचा वृत्तांत आपल्या संपादकाला सादर केला. त्यांत त्यानं एका ठिकाणीं लिहिलं होतं-'तीन हजार नऊशें नव्याण्णव डोळे वक्त्याकडे लागले होते.'

संपादक महाशयांनीं हें वाक्य वाचलं तेव्हां त्यांनीं ताबडतोब त्या बातमीदाराला आपल्यासमोर बोलावलं, आणि त्याच्यावर रागावून ते म्हणाले, 'हें साफ खोटं आहे-हें इथं तुम्हीं लिहिलंय तें-तीन हजार नऊशें नव्याण्णव डोळे वक्त्याकडे लागले होते—'

'नाहीं साहेब, अगदीं खरं आहे तें,' नवखा वार्ताहर म्हणाला. 'साहेब, श्रोतृवर्गांत एक एका डोळ्यानं आंधळा असलेला माणूस होता आणि तो माझ्या शेजारींच बसलेला होता.'

अनुक्रमणिका

बघितलं म्हणजे चंद्या तिला 'मेनका' म्हणतो. बायडीनं कधींतरी तें ऐकलं आणि मनांतल्या मनांतच ती लाजली. घारूअण्णा त्यावेळीं तिथें असते तर लाजेमुळं बायडीच्या गालावरची तांबुस काळी झाक अधिकच गर्द झालेली त्यांना पहायला मिळाली असती. बायडीला नेहमीच वाटतं चंद्या फाजील आहे. जंगली आहे. अगदीं शम्मीकपूरसारखा जंगली आहे. मग ती मनांतल्या मनांतच मोठ्यानं 'या ऽऽ हू' करते.

घारूअण्णाच्या चोरट्या नजरेला हें सारं कळतं. त्यांना हें असलं अजिबात आवडत नाहीं. सिनेमा बघून कार्टी बिघडतेय असं त्यांना सारखं वाटतं. पण कार्टीही आईच्याच वळणावर चाललेली होती यांत त्यांना बिलकूल शंका राहिलेली नव्हती.

म्हाळसाकाकूंना सुरवातीला सिनेमाचं नांवही माहीत नव्हतं. कथा–कीर्तन, पुराणांतच त्यांना गोडी होती. घारूअण्णांनीं तमाशाचं नांव काढलं तर त्यांनीं त्यांचा कान लाल होईपर्यंत पिळला होता. शिमग्यांतही असलें कांहीं चाळे करायचे नाहींत हें त्यांनीं घारूअण्णांना बजावून ठेवलेलं होतं पण जमाना साराच बदललेला होता. बायडी वयांत यायला लागली, तसतसा म्हाळसाकाकूंच्या पिकल्या पानाच्या देठांत हिरवा रंग पुन्हां भरायला लागला होता. देवादिकांचे सिनेमा पहातां पहातां म्हाळसाकाकू आतां प्रेमाचे पिक्चरही चवीनं पहायल्या लागल्या होत्या. दिलीपकुमार, मीनाकुमारी, नर्गिस यांच्याबद्दलच त्या स्वयंपाक घरांत चर्चा करायला शिकल्या होत्या. नवा सिनेमा लागला कीं त्यादिवशीचं कीर्तन–पुराण बंद! त्या घारूअण्णांना घेऊन फॅमिली सर्कलमध्यें तडक निघतात. 'रंगल्या रात्रीं...' आपल्याला आवडला असं त्या परवा म्हणाल्या तव्हां घारूअण्णांना वाटलं आईच्या लाडानं पोरगी बिघडली आणि पोरीच्या सिनेमाच्या नादानं आई बिघडली!

सिनेमा पाहिला कीं, दुसऱ्या दिवशीं बायडीचा सिनेमा घरीं सुरु होतो. आरशापुढं बसलं कीं, सारीं गाणीं एकामागून एक सुरूं होतात. पंप्या डब्याचा ताल धरतो. चुकलेली कडवी म्हाळसाकाकू दुरुस्त करतात. घारूअण्णा देवाच्या बोडख्यावर पाण्याची धार लावून 'हरिपाठ' म्हणत असतात. त्यांना यांतलं कांहींच पसंत पडत नसतं. मध्येंच म्हाळसाकाकू म्हणतात, 'छान आहे नाहीं आपल्या बायडीचा आवाज?' घारूअण्णा म्हणतात, 'तर तर अगदीं त्या...' कुणासारखा तें त्यांना आठवतच नाहीं. 'लता मंगेशकरसारखा.' घारूअण्णांचं वाक्य पंप्या पुरं करतो आणि मग बायडीचं दुसरं गाणं नव्या तालांत सुरूं होतं. घारूअण्णांना वाटतं कसला हा बेडकीसारखा आवाज! चाळींतलीं पोरं म्हाळसाकाकूंना बेडकी म्हणतात. आतां कार्टीही आईच्याच वळणावर चाललेली आहे.

घारूअण्णांना अलीकडं चंद्याचा संशय यायला लागला होता. अभ्यासाच्या नांवाखालीं बायडी आणि चंद्या क्लासला जाऊन कांहीं तरी गडबड करीत असले पाहिजेत असं त्यांना वाटायला लागलं होतं. म्हाळसाकाकूंना त्यांनीं याबाबत जेव्हां सांगितलं त्यावेळीं म्हाळसाकाकू घारूअण्णांवर केवढ्यांदा खेकसल्या होत्या. जणूं त्यांना म्हणायचं होतं, 'कांहीं अक्कल आहे का तुम्हांला? असेल त्यांचं लव्ह बिव्ह!' घारूअण्णांना या लव्हचा प्रकार उभ्या आयुष्यांत कधीं समजला नव्हता. त्याच्या वाटेलाच ते कधीं गेलेले नव्हते. पण त्याची लज्जत म्हाळसा-काकूंना कशी समजली याचंच त्यांना आश्चर्य वाटत होतं. सिनेमा पाहून म्हाळसाकाकूंहीं असलं लव्ह बिव्ह कुठं करीत नाहीं ना? असाही त्यांना दाट संशय आला. पण त्यांचा संशय तो संशयच राहिला!

असल्या या नकली नवेपणाचा अर्क पचवीत असलेल्या बायडीच्या शेजारीच पंप्या तिला काटकोन होऊन आडवा तिडवा पडला होता. घारूअण्णांची जखमी नजर आतां त्याच्याकडे वळते.

बायडीसाठीं जेवढं आपण केलं तेवढं पंप्यासाठीं आपल्याला करतां आलं नाहीं याची खंत त्यांच्या मनांत उभी रहाते. वास्तविक पंप्या हाच आपल्या घराचा वंशाचा दिवा! त्याला एखाद्या फुलवाती-सारखा जपायला हवा होता. पण म्हाळसाकाकू आणि बायडी यांचं करतांकरतांच सारा दिवस उलटून जायचा आणि पंप्याकडं लक्ष द्यायला वेळ मुळी उरायचाच नाहीं. त्यांना वाटतं आपल्या आयुष्यांत आपणाला आपल्या मनासारखं जरी कांहीं करतां आलं नाहीं तरी पंप्या मात्र त्याच्या आयुष्याचा तोच मालक व्हावा. पण त्याचेही पाय पाळण्यांत दिसायला लागले होते. पोरटं बापाच्याच वळणावर जायला लागलं होतं!

घारूअण्णांना वाटलं आपण आपल्या आयुष्यांत घेतले एवढे कष्ट पुरे झाले. निदान तशी पाळी पोरावर तरी येऊं नये. पाठीच्या कण्याला बाक येईपर्यंत आपण पाणी भरलं, निदान पोरानं तरी ताठ मान करून चालायला हवं. आपण गांवभर फिरून शेण गोळा केलं; निदान पोरावर तशी पाळी येऊं नये. त्यानं कां शेण गोळा करायचं? त्यानं गोळा करायचे पैसे! म्हाळसाकाकूंची आणि बायडीची धुणी आपण स्वतः धुतली, वाळत टाकली. निदान पोरानं तरी इस्तरीच्या कपड्यांत फिरावं. दळणं आणली, कांडणं केली, भांडी घासली, उष्टी काढली, शेण लावलं, किराणा मालाच्या दुकानीं हजार खेपा केल्या, वाती वळल्या, अंथरुणं घातली, काढली. एखाद्या आज्ञाधारक पत्नीसारखं म्हाळसा-काकूसाठीं रात्रीं पाण्याचा तांब्यासुद्धां भरून रोज नियमित नेला...

आणखी कांहीं पाळीव प्राणी!



काय...काय वाटेल तें केलं. जें खरं करायला नको होतं, तें तें सारं केलं. न तक्रार करता, न कुंरकुरता, मुकाटपणानं केलं. निदान आपल्या मुलाच्या नशिबीं तरी हें न यावं. पण पोराचीं पावलं मात्र आपल्या पावलावरच पडत असल्याची घारूअण्णांची आतां स्पष्ट खात्रीच व्हायला लागली होती.

पंप्या मोठमोठ्यानं भसाड्या आवाजांत कविता म्हणूं लागला म्हणजे म्हाळसाकाकू म्हणायच्या, 'माझा पंप्या हुशार आहे नाहीं ! चांगलं घराण्याचं नांव काढील. माझा पंप्या इंजिनिअर नाहीं तर प्रोफेसर होणार आहे !' हें ऐकलं म्हणजे एकदम बरं वाटतं पण ज्यावेळीं आपला पंप्या चाळींतल्या उनाड पोरांत खेळतांना बेदूल लांबून बरोबर टिपतो, दुमडलेल्या जिभेखालीं दोन बोटं घालून एखाद्या मवाल्यासारखा शिट्या फुंकतो, उगीचच हॅऽ हॅऽ हॅऽ...करून हंसतो हे त्यांच्या लक्षांत येतं त्यावेळीं तो पी. डब्ल्यू. डी.चा रोडक्लार्क किंवा शा. मा. तरी होईल कीं नाहीं याची त्यांना शंका यायला लागते.

घारूअण्णांना वाटतं आपल्या घरांत सारं कांहीं चुकतं आहे. आत्तापर्यंत सारं काहीं चुकत आलेलं आहे. नशीब काढायला म्हणून आपण इथें आलों आणि कांहींच्या कांहीं होऊन बसलं. नवं नवं म्हणून ज्या ज्या गोष्टी आपल्या घरांत शिरल्या त्या त्या साऱ्या आचरटपणाच्याच ठरल्या. म्हाळसाकाकूंच्या आहारीं आपण इतकं जायला नको होतं. आपण आपलं स्वत्व सोडून बसलों आणि सारंच कांहीं गमावून बसलों. सकाळीं उठल्यापासून तें रात्रीं अंथरुणाला पाठ लागेपर्यंत आपण केवळ गाढवासारखे कष्ट उपसतो. म्हाळसाकाकू आणि बायडी मात्र नवेपणाच्या नांवाखालीं खुशाल आराम आणि चैन करीत आहेत. प्रत्येक गोष्ट त्या फॅशन म्हणून स्वीकारतात. प्रेम करणं म्हाळसाकाकूंना आज फॅशन वाटतें, उद्यां बायडी एखाद्याचा हात धरून पळून गेली तर म्हाळसाकाकू त्याला सुद्धां फॅशनच म्हणतील आणि सांगतील, 'त्या अमुक अमुक सिनेमांत ती वैजयंतीमाला राजकपूरबरोबर पळून गेली; तसंच आपल्या बायडीचं !'

हें असलं घारूअण्णांच्या बापजन्मीहि ठाऊक नाहीं. अजूनहि घारूअण्णा न्हाव्याकडून हजामत करून घेतल्यावर न्हाव्याच्या हातावर ते लांबून पैसे टाकतात. त्यांना हा असला प्रकार कसा मानवायचा !

म्हाळसाकाकू कधीं कधीं म्हणतात, 'आपली बायडी हाफिसांत नौकरी करणार आहे.' घारूअण्णांच्या पोटांत एकदम कालवायला लागल्यासारखं होतं. कुठल्याशा ऑफिसांत, कुठल्या तरी मुलीला, कुणातरी एका मवाल्यानं फसविल्याबद्दल त्यांनीं कधीं तरी वर्तमानपत्रांत वाचलेलं त्यांना आठवत असतं आणि भीतीनं त्यांच्या पोटांत गोळा उठायला लागतो. सारं सारं चुकतं आहे असं त्यांना वाटायला लागतं. आणि ही गाडी आतां कोठपर्यंत जाणार याची चिंता त्यांना वाटूं लागते.

मग ते मनाशींच म्हणतात आतां फार फार उशीर झाला. पाण्याचा वेग वाढण्यापूर्वींच त्याला बांध घालायला हवा होता. आतां त्याची ओढ वाढली आहे. आतां त्याला आपण वळण द्यायच्या ऐवजीं आपणच त्या वळणानं वहात जाणं अगत्याचं आहे. कसलाहि प्रतिकार न करतां. जसं जाईल तसं !

—आणि मग त्यांना परवा पडलेलं एक स्वप्न आठवूं लागतं.

सारा गांव जमा झालेला आहे. आपल्या घरासमोर मोठा मंडप घातलेला आहे. सनई–बॅंड तालसुरांत वाजत आहेत. अक्षता घेऊन सारी मंडळी सज्ज झालेली आहे. लतापल्लवांनीं सजवलेल्या बोहल्यावर आपण उभे आहोंत. वधूपक्षाकडील मंडळी म्हाळसाकाकूंना हलक्या हातानं धरून बोहल्याकडं आणीत आहेत. अचानक साऱ्या मंडपांत शांतता होते. मंगलाष्टकें सुरू होत आहेत. शेवटचें अष्टक संपते आहे आणि आपण म्हाळसाकाकूंच्या गळ्यांत माळ घालतो आहोंत. म्हाळसाकाकूही आपल्या गळ्यांत माळ टाकते आहे. मंगळसूत्र आणलें जात आहे.

—आणि काय आश्चर्य ! आपण म्हाळसाकाकूंच्या गळ्यांत मंगळसूत्र बांधण्याऐवजीं म्हाळसाकाकूच आपल्या गळ्यांत मंगळसूत्र बांधीत आहेत. आपण प्रतिकार करीत आहोंत आणि सारी गांवकरी मंडळी मात्र जबरदस्तीनें आपल्या गळ्यांत मंगळसूत्र बांधण्याच्या प्रयत्नांत आहेत. वाण्याचा गजा, साळ्याचा किशा आणि न्हाव्याचा राजा आपली चेष्टा करीत आहेत, 'बायकोची बायको बघा; अरे बायकोची बायको बघा.' असं मोठमोठ्यानं आर्जवून म्हणत आहेत.

केवढा मोठा विचित्र प्रसंग ! अलार्ममध्यें कर्कश गजर झाला आणि धडपडून जाग आली म्हणून बरं नाहींतर पुढं काय झालं असतं कोणास ठाऊक ?

घारूअण्णांना एका अर्थानं सारं सारं खरं वाटतं. आपण बायकोची बायको आहोंत हें त्यांचं त्यांनाच पटलेलं असतं पण आतां त्याला कांहींच इलाज नसतो.

कारण हातांतल्या अलार्मनें कितीतरी वाटचाल केलेली असते आणि अजूनहि ते तसंच पुढेंहि वाटचाल करणार असतं. घारूअण्णांना वाटतं हातांतल्या या अलार्ममध्यें आणि आपणांत कांहीं फरक आहे कां ? कुणीतरी किल्ली दिली तर तें निमूटपणें चालतें. न थांबता, न अडखळता, न प्रतिकार करता. अगदीं सरळ सरळ !

तसंच आपलंहि नाहीं कां ? म्हाळसाकाकू सांगतील तसं चालायचं न थांबता. न अडखळता. न प्रतिकार करता. अगदीं सरळ सरळ !

—आणि म्हणूनच उभ्या आयुष्यांत त्यांनीं या घड्याळावर जेवढं प्रेम केलं तेवढं कुणावरही केलं नाहीं !















मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास






मंडला जिल्ह्यांतील आदिवासी विभागांत विकासकार्याची सुरुवात सरकारनें केली आहे. जुन्या मध्यप्रदेश राज्यांतच ही सुरुवात झाली. डिंडोरीहून अमरकंटककडे जाणाऱ्या रस्त्यालगत सामुहिक विकास योजनेचें क्षेत्र आहे. गोरखपूर-पासून तों अमरकंटकच्या अगदीं पायथ्याशीं असलेल्या शेवटच्या गांवापर्यंत सामुहिक विकासाची सीमा आहे व त्या क्षेत्रांत १२० गांवें आली आहेत. ह्यांत कांहीं बैगा लोकांचीहि गांवें आहेत.

ह्या विभागांतील आदिवासी लोकांच्या गरजाच इतक्या थोड्यां आणि माफक आहेत कीं, हें विकासाचें कार्य अगदीं हाताच्या मळाप्रमाणें वाटावें !

डिंडोरीचा सपाट प्रदेश अत्यंत सुपीक आहे. येथें उत्कृष्ट गहूं होतो. नर्मदा नदीच्या पाण्याचा जर योग्य उपयोग केला गेला, तर गव्हाचें पीक दुपटीनें येऊं शकेल. ह्या विभागांत राष्ट्रीय विचार सेवा योजनेची आणखी प्रगति व्हावयास हवी. डिंडोरी तहसिलींतील ह्या सुपीक जमिनीची धूप होत आहे. जमिनीची धूप नष्ट करण्याचे उपाय येथें लवकर योजले गेले पाहिजेत. कित्येक जागीं दीड–दोन पुरुष खोल भेगा जमिनींत पडलेल्या मी प्रत्यक्ष पाहिल्या. हा प्रकार थांबविला नाहीं, तर आणखी कांहीं वर्षांनीं ह्या सुपीक जमिनीचें करुस्थल झाल्याविना राहणार नाहीं !

काल्पी आणि बोंदर ह्या दोन ठिकाणांचा मुद्दाम उल्लेख करावासा वाटतो. काल्पी हें ठिकाण मंडल्यापासून ३२ मैलांवर आहे. येथें एक पूर्वमाध्यमिक शाळा चालू आहे. ह्या शाळेंत जवळ जवळ १५० विद्यार्थी आहेत; पैकीं ५० विद्यार्थिनी आहेत. सर्व विद्यार्थी आदिवासी जमातींतलेच आहेत. दहा शिक्षक आहेत व तेहि आदिवासीच आहेत. १९४६ पर्यंत ही शाळा जंगल खात्याकडे होती. आतां

**'कजरीबनांतील बैगा'** *या आदिवासी जमातीचा व त्यांच्या प्रदेशाचा वास्तव व यथार्थ परिचय करून देणाऱ्या लेखमालेचे चार भाग आतांपर्यंत तुम्ही वाचलेत. त्याच लेखमालेचा हा वाचनीय पण शेवटचा लेख...*



# विंध्य वसुंधरा

—यशवंत शास्त्री

शिक्षणखात्यानें तिचीं सूत्रें आपल्या हातीं घेतलीं आहेत. स्वावलंबनाच्या पद्धतीनें चाललेली ही एक आदर्श शाळा आहे. शाळेची इमारत तेथील विद्यार्थीनीच बांधली आहे व ती सुंदर आहे. त्यांनीं आपलें स्वतःचें एक वसतीगृहाहि तेथें उभारलें आहे. आपल्याच श्रमानें सुंदर विटा तयार करून बांधलेली ही इमारत, एखाद्या आधुनिक शहरी इमारतीची सहज बरोबरी करूं शकेल. तेथें विद्यार्थ्यांच्या हस्तकौशल्याचे सुंदर नमुनेहि दृष्टीस पडतात. आदिवासी नृत्याचे प्रकार ह्या विद्यार्थ्यांनीं आत्मसात केले आहेत. गणराज्य दिनाचें-वेळीं, काल्पीच्या ह्या विद्यार्थ्यांना दिल्लीस नेण्यांत आलें होतें; आणि तेथें त्यांना आदिवासी नृत्यप्रकाराबद्दल राष्ट्रपतींनीं दुसऱ्या अनुक्रमाचें पारितोषिकहि प्रदान केलें होतें. दिल्लीहून परत आल्यानंतर, ह्या विद्यार्थ्यांनी पंजाबी व पेप्स पद्धतीचीं नृत्येंहि बसविलीं आहेत. आदिवासी क्षेत्रांत वर्धा–शिक्षण पद्धति विशेष कार्यक्षम व उपयोगी ठरूं शकते, हें ह्या संस्थेनें सिद्ध केलें आहे.

काल्पी येथील विद्यार्थ्यांनीं आपली एक शेतकीविषयक प्रयोग शाळाहि स्थापन केली आहे. निरनिराळ्या फळांच्या झाडांचीं जोड-कलमें लावण्यांत त्यांनीं मिळविलेलें यश प्रशंसनीयच ठरेल. बोंदर येथील आदिवासींचा आश्रमहि पाहिला. डिंडोरी–अमरकंटर रस्त्यावर १३ व्या मैलापासून बोंदरकडे रस्ता जातो. हा आश्रम भरभराटीस आला आहे. तेथें गेल्यानंतर सेवाग्रामची आठवण होते. आदिवासी मुलें व मुली येथें वास्तव्याला आहेत.

अमरकंटकला जाण्यापूर्वी मी 'बैगा चक'-मध्यें प्रतक्ष जाऊन आलों होतों. जवळ जवळ ५० मैलांचा अंतर्गत टापू मी पाहिला. तेथील बैगांच्या जीवनाचा उल्लेख मी पूर्वीच केला आहे. हा प्रदेश सृष्टिसौंदर्याच्या दृष्टीनें काश्मीरच्या सृष्टिसौंदर्याची बरोबरी करणारा आहे. काश्मीरचे लोक सुंदर आहेत व येथील बैगा आदिवासी त्यांच्या मानानें कुरूप आहेत, हाच काय तो फरक ! ज्यांनीं काश्मीर पाहिलें नसेल, त्यांनीं हा प्रदेश पाहून यावा. काश्मीर पाहिल्याचें समाधान लाभेल.

येथें पाटणगड ह्या ठिकाणाचा मला वैशिष्ट्यानें व प्रामुख्यानें उल्लेख करावयाचा आहे. मानव वंश विज्ञानशास्त्राचे (अँथ्रॉपॉलॉजी) खरेंखुरें संशोधन, ह्याच जागीं बसून, डॉ. व्हेरियर इल्विन यांनीं केलें आहे. पाटण हें गांव एका छोट्याशा उंच टेकडीवर डिंडोरीपासून ३१ मैलांवर, कबीरचबुतऱ्याच्या रस्त्यावर वसलें आहे. डॉ. इल्विन यांनीं ह्याच ठिकाणीं एक सुंदर आश्रम उभारला आहे. वर्षांतील आठ महिने आपलें संशोधन कार्य करीत रहावयाचे आणि पावसाळ्याचे चार महिने पाटणगडला येऊन, आश्रमाच्या शांत आणि सुंदर वातावरणांत समोर टाईपरायटर घेऊन आपला ग्रंथसंभार लिहून काढावयाचा असा त्यांचा उपक्रम असे. ह्या ठिकाणीं त्यांनीं एक आधुनिक प्रशस्त झोंपडीवजा—बंगली उभारली आहे. येथें मी जाऊन आलों. ही बंगली गवतानें आच्छादिलेली आहे; आणि आंतील दालनांच्या निरनिराळ्या विभागांत सर्व प्रकारच्या सोयी त्यांनी करून ठेवल्या आहेत.

ही बंगली आणि त्या भोंवतालची गडाची संपूर्ण जागा म्हणजे, मानव वंश संशोधन शास्त्राचा एक नेत्रदीपक 'म्युझियम' आहे. गवती बंगलीच्या आसपास फुलझाडें लावलीं आहेत व तीं फुलझाडेंसुद्धां आदिवासी विभागांत दिसणाऱ्या फुलझाडांचीं प्रतिकें आहेत. गडावर चढून जातांच समोर वडाचें एक झाड आहे. ह्या झाडाखालीं आदिवासींच्या कलाकुसरीचें दगडावरील कोरीव काम केलेलें दगड ठेवले आहेत. डॉ. इल्विन यांनीं गोळा केलेली ही अमोल संपत्ति आहे. गडाखालीं डॉ. इल्विन यांनीं रस्त्याच्या पलीकडे एक छोटासा तलाव खोदून घेतला आहे. बंगलीच्या व्हरांड्यांतून तलावाचें हें दृश्य रमणीय दिसतें आणि भोंवतालच्या सपाटीपलीकडील मैकल पर्वताचे डोंगरहि दृष्टि आकर्षून घेतात.

ह्या बंगलींत तुम्हीं जेथें नजर टाकाल तेथें तुम्हांला आदिवासी लोकांच्या जीवनाचा प्रत्यय येईल. भिंतीवर चित्रें लावलीं आहेत. मातीच्या भिंतींत गोंडींच्या देवतांच्या मूर्ति आहेत. आदिवासी कलेचीं प्रतीकें खिडक्यांच्या तावदानांवर व लाकडी फळकुटांवरहि कोरण्यांत आलीं आहेत. निरनिराळ्या रानटी जमातींतील स्त्री–पुरुषांचे पुतळे आहेत. इतकेंच काय, पण खुर्च्या व पलंगाचे गातसुद्धां ह्या गोंडी आदिवासींच्या लाकडी प्रतीकांनीं मढविले आहेत. नाना देशांतील नाना आदिवासींचे प्रकार व कलाकुसर ह्या बंगलींत सामावली आहे—साकार झाली आहे.

डॉ. इल्विन यांना ह्या विभागांत 'बडा भाई' म्हणून ओळखलें जातें. डॉ. इल्विन यांचा 'उजवा हात' समजले जाणारे श्री. शामराव हिवाळे यांचेंहि वास्तव्य ह्याच आश्रमांत होतें. श्री. हिवाळे ह्यांना लोक 'छोटा भाई' ह्या नांवानें ओळखत. श्री. हिवाळे हे आदिवासी असून, त्यांनीं डॉ. इल्विन यांच्या संशोधन कार्यास बराच हातभार लावला आहे. बडा भाई डॉ. इल्विन यांना भारत सरकारनें आसाम प्रांतांत मुद्दाम संशोधनासाठीं पाठविलें आहे व छोटाभाई श्री. हिवाळे यांनीं जबलपूर हें आपलें निवासस्थान केलें आहे. ह्या दोघांच्या गैरहजेरींत पाटणगड आज ओस पडल्यासारखा झाला आहे. पाटणगडच्या आपल्या कुटींतील बरीचशीं पुस्तकें व साहित्य डॉ. इल्विन हे सोबत घेऊन गेले आहेत. इतक्यावरहि, तेथें जें साहित्य शिल्लक राहिलें आहे, त्याचा मानव वंश संशोधन शास्त्राचा एक सुंदर म्युझियम सहज तयार होऊं शकेल. एक संस्मरणीय संग्रहालय म्हणून पाटणगडची व तेथील प्रत्येक वस्तूची जोपासना व्हावयास हवी.

डॉ. इल्विन हे आतांशा पाटणगडला कंटाळले असावेत असें वाटतें. असें होण्यास कारणें आहेत. आदिवासींत ते आल्यानंतर त्यांनीं बहुमोल कामगिरी बजावली व लोकांना आपलेसें करून घेऊन त्यांच्यांत ते एकजीव झाले होते. परंतु ह्या प्रकारामुळें कांहीं

तथाकथित पोटभरू देशी आदिवासी ' कार्यकर्त्यां ' च्या पोटांत दुखूं लागलें. विशेषतः वनवासी सेवा मंडळाच्या कांहीं कार्यकर्त्यांनीं व इतर राजकारणी लोकांनीं आपली प्रतिष्ठा वाढविण्यासाठीं, डॉ. इल्विन यांच्या विरुद्ध नाना तऱ्हेचे आरोप करण्यास व कुभांड रचण्यास सुरुवात केली. मिशनऱ्यांशी त्यांनीं त्यांचा संबंध जोडला. परंतु इल्विन हे मिशनरी म्हणून ह्या प्रदेशांत आल्यानंतर, मिशनऱ्यांच्या अनिष्ट कार्यपद्धतीला कंटाळून मिशनचा संबंध त्यांनीं कधींच तोडून टाकला होता. ते एकनिष्ठावंत आदिवासी कार्यकर्ते होते. त्यांनीं आदिवासींसाठीं जें केलें तें कार्य आजचे सरकारच्या अनुदानावर पोसले जाणारे पोटभरू कार्यकर्ते अद्यापहि करूं शकले नाहींत व करण्याची पात्रताहि त्यांच्यांत तिळमात्र नाहीं.

पाटणगडच्या पुढें कांहीं अंतरावर मैकल पर्वतांतील अमरकंटक हें ठिकाण आहे. येथूनच नर्मदा व शोणभद्रा ह्या ख्यातमान नद्यांचा उगम झाला आहे. जवळ जवळ अकरा वर्षांपूर्वी प्रथम मी अमरकंटकला गेलों होतों. त्या वेळीं तेथें जाणें म्हणजे बद्रिकेदारच्या यात्रेला जाण्यासारखेंच कठीण होतें. आतां ह्या ठिकाणाचा खूपच विकास झाला आहे. थेट नर्मदेच्या देवळापर्यंत आणि पुढें बाईच्या बगिच्यापर्यंत व शोणभद्रेच्या उगमापर्यंत व अलिकडे कपीलधारा–सहस्रधारापर्यंत मोटारनें सहज जातां येऊं लागलें आहे. पूर्वी जेथें आठ–दहा झोंपड्यांत मनुष्यांचें वास्तव्य होतें व इतर सर्वत्र श्वापदांची भीति होती, तेथें आज एक सुंदर गांव वसलें आहे नर्मदेचा उगम होतो, त्या ठिकाणापासून, नर्मदेच्या पलीकडे विंध्य प्रदेशाची व अलिकडे ( पूर्वीच्या ) मध्यप्रदेशाची सीमा आहे. दक्षिण भारतांतील प्रमुख तीर्थक्षेत्रांत अमरकंटकची गणना होते.

कलचुरी कालीन मंदिरांचें वैभवहि येथें दृष्टीस पडतें. येथील सौंदर्यामुळें ह्या ठिकाणाला ' विंध्य वसुंधरा ' असेंहि नांव मिळालें आहे. महाकवि कालिदासालासुद्धां ह्या मैकल पर्वतराजींतील अमरंकंटकचा उल्लेख करण्याचा मोह आवरता आला नाहीं. कबीरचबुतरा हेंहि ठिकाण येथेंच आहे. कबीर येथें वास्तव्यास होता. ह्या कबीरचबुतऱ्यापासून तो नर्मदेकांठच्याच गुजरातेंतील शुकुलतीर्थानजीकच्या कबीरवडापर्यंतचा प्रदेश कबीरानें हिंडला होता. कबीराचीं कवनें ह्याच नर्मदेच्या खोऱ्यांत निर्माण झालीं व नर्मदेच्या सलील श्रीमान प्रवाहावरच तिचे पडसाद उमटले व तेच पडसाद नंतर भारतव्यापी झाले !

नर्मदेचा उगम असलेल्या अमरकंटकजवळच पंचमढीसारखें थंड हवेचें ठिकाण उभारण्याचा सरकारचा मानस असल्याचें समजतें. अमरकंटक येथील नर्मदेचें मंदिर दहाव्या शतकांत उभारलें गेलें. नंतर अहिल्याबाई होळकरांनीं त्याचा जीर्णोद्धार केला व पलीकडे एक धर्मशाळाहि उभारली. नर्मदेचा उगम एका वेळूंतून ( बांस–बांबू ) झाला होता. तें वेळूचें मुख आतां बांधून टाकलें आहे. भोंवतीं मोठें कुंड आहे. ह्या कुंडापासून कांहीं अंतरावर महादेवाचें एक छोटेसें देऊळ आहे. कुंडांतील पाणी पावसाळ्यांत या छोट्या मंदिरांतील महादेवाच्या पिंडीपर्यंत गेलें कीं, प्रलय ओढवतो अशी समजूत आहे. १९२६ च्या पावसाळ्यांत पिंडी पाण्याखालीं गेली होती व तेव्हां नर्मदेला महापूर येऊन मंडाल्यापर्यंत व पुढें जबलपूरपर्यंत हाहाःकार उडाला होता. मंडला शहर तर जलमय झालें होतें. कुंडांतील उगमानंतर कांहीं यार्ड अंतर नर्मदा गुप्त झाली आहे व नंतर लगेच प्रकट होऊन, एकाद्या लहान अर्भकाप्रमाणें धावूं लागली आहे. कपिलधारेपर्यंत ह्या नर्मदेनें बाळसें धरलेलें असतें व नंतर








ती, तारुण्यांत नुकतेंच पदार्पण केलेल्या ललने-प्रमाणें नाचतमुरडत पुढें पुढें जाऊं लागते. येथून जवळच माई की बगिया आहे.

ह्या माई की बगियामध्येंच 'गुलबकावली'चीं झाडें दृष्टीस पडतात. सुमारें आठ ते दहा फूट उंचीचीच हीं झाडें असतात. त्यांचा बुंधा अगदीं कमळाच्या देठासारखा असतो. झाडाच्या शेंड्यावर कर्दळीच्या पानांसारखीं चार–सहाच पानें येतात. कार्तिक महिन्यांत ह्या झाडाला पांढरीं व लांब आकाराचीं फुलें येतात व तीं केवळ महिनाभर टिकून असतात. नंतर वर्षभर ह्या झाडाला फुलें येत नाहींत. हीं सर्व झाडें माई की बगियामधील एका दलदलीच्या जागीं उगवलीं आहेत व ह्या जागेव्यतिरिक्त तीं इतर कुठेंहि दृष्टीस पडत नाहींत. हें ह्या झाडाचें वैशिष्ट्य होय. ह्या दुर्मिळ वृक्षाचा उल्लेख कथा-पुराणांतून बराच झाला आहे. अरबी भाषेंतील कथांतील 'गुल-बकावली'चें दुर्मिळ पुष्प तें हेंच होय! शेजारीच शोणभद्रा नदीचा उगम आहे व ती एका प्रचंड प्रपातावरून, उडी घेतल्यासारखी खालच्या दरींत येऊन पुढें वहात गेली आहे. हें उगमाचें ठिकाण रमणीय आहे व तेथून खालीं नजर टाकल्यानंतर 'बैगाचक'-मधील 'बेवाट' केलेलें पहिलें शेत दृष्टीस पडतें. अमरकंटकचा नर्मदेपलिकडील भाग पूर्वीच्या विंध्य प्रदेशांत येत असला, तरी नर्मदेचें देऊळ पूर्वीच्या मध्यप्रदेशांतच होतें. राज्यपुनर्रचनेनंतर नव्या मध्य प्रदेशांत विंध्य प्रदेश आल्यामुळें, आतां ती भिन्नता राहिलेली नाहीं.

मध्यप्रदेशाच्या सीमेंत येणाऱ्या अमरकंट-कच्या एका विभागांत कबीरचबुतरा आहे, हें वर सांगितलेंच. येथील हें ठिकाण भक्त कबीराचें निवासस्थान होतें. अमरकंटक ही सुप्रसिद्ध तंट्या भिल्लाचीहि जन्मभूमि आहे. तंट्या भिल्लाचा जन्म झाला, तेथें आजहि एक मोडकी झोपडी आहे. हें ठिकाण निम्में पूर्वीच्या विंध्य प्रदेश–मध्य प्रदेश सीमेवर आहे. कबीर-चबुतरा येथें एक सरकारी सुंदर बंगला आहे.

अमरकंटकनंतर आम्हीं दुसरें रमणीय व घनदाट अरण्याचें ठिकाण पाहिलें, तें कान्हा–केसली. कान्हा–केसलीचें प्रचंड जंगल मोती नाल्याच्या जंगलाशीं भिडलें असून, तिकडे बालाघाट जिल्ह्यांतील सूपखार–मुक्कीच्या जंगलापर्यंत जाऊन भिडलें आहे. भारत सरकारचे कृषिमंत्री डॉ. पंजाबराव देशमुख हे कांहीं दिवसांपूर्वी येथें गेले होते. त्यावेळीं ९४ चौरस मैलांचा घनदाट अरण्याचा 'नॅशनल पार्क' निर्माण करण्याची योजना ह्याच कान्हा येथील डाक बंगल्यांत उदयास आली.


आणखी कांहीं पाळीव प्राणी !

'नॅशनल पार्क'ची ही योजना लांब मुदतीची असली, तरी त्या दृष्टीनें उपक्रमास सुरुवात झाली आहे. ही योजना पूर्ण झाल्यानंतर चांदा जिल्ह्यांतील आलापल्लीपासून तों मंडल्यापर्यंतचा घनदाट अरण्याचा विशाल विभाग एक होईल. कान्हा हें आज 'रिझर्व्हर्ड फॉरेस्ट' (राखीव जंगल) आहे व तेथें सर्व प्रकारचीं जंगली जनावरें दृष्टीस पडतात. सर्वसामान्य माणसाला कान्हा पहाणें कठीण आहे. कारण नैनपूर–मंडला रेल्वे मार्गावरील चिराई डोंगरी ह्या छोट्याशा स्टेशनवर उतरून २७ मैलांचा जंगली रस्ता चालून जावा लागतो. सर्वांजवळ मोटारी असतातच असें नाहीं.

शिवाय, मंडला जिल्ह्याचें वैशिष्ट्य तें हें कीं, तेथें खेडोपाडीं तुम्हांला बैलगाड्या दृष्टीसच पडणार नाहींत. केवळ घोड्यावरून वर्दळ चालते. एका गांवांतून दुसऱ्या गांवांत जाव-याचें म्हणजे, हटकून डोंगर ओलांडावा लागतो व म्हणून तेथें घोड्यांशिवाय दुसरें वाहन उपयोगी ठरत नाहीं. कान्हा हें श्वापदांचें आगर आहे. हत्ती व सिंह सोडल्यास येथें सर्व प्रकारचीं श्वापदें भरपूर आहेत. शेंकडों हरणांचे कळप किंवा 'बायसन्स'च्या झुंडी तुम्हांला दिवसाढवळ्या दृष्टीस पडतील आणि वाघ किंवा चित्ता ही वस्तु चालतांबोलतां तुमच्या समोरून निघून जाईल. रिझर्व्हड फॉरेस्टची हद्द ओलां-डल्यानंतर, मोती नाल्याच्या जंगलांतहि भरपूर श्वापदें आहेत. ह्याच जंगलांत आम्हीं एका चित्याची पहिली शिकार केली. ह्या जंगलांत अमेरिकन–इंग्रज 'टूरिस्ट' वरचेवर येत असतात. कान्हा येथील अरण्य पुरातन आहे व 'रामायणा'शीं त्याचा संबंध आहे. दशरथ राजाच्या 'शब्दवेधि' बाणामुळें श्रावणाचा वध ह्याच जंगलांत झाला होता. श्रावणाला तो पाणी पिण्यास गेला असतांना, ज्या ठिकाणीं दशरथाचा बाण लागला, त्या ठिकाणीं अद्यापहि एक तलाव आहे व तो 'श्रावण तलाव' म्हणून ओळखला जातो. दशरथ राजाच्या वेळेपासून कान्हाचें हें जंगल शिकारी लोकांच्या हालचालींचें ठिकाण झालेलें आहे व तीच परंपरा आजहि चालू आहे, असें म्हटल्यास हरकत होणार नाहीं. कान्हाचें हें जंगल पुढें बालाघाटमधील केसलीच्या जंगलास मिळालें असून, त्याला पुढें कान्हा–केसली अशा नांवानें संबोधण्याचा प्रघात पडला आहे.

बैगा जमातीच्या मंडल्यांतील वास्तव्याची कहाणी येथें संपते.

●●●



# बा य का

## त्यांच्या संवयी व त्यावरील उपाय

—विठ्ठल रामजी भाटकर

विषय फार गहन असल्यामुळें तो समजण्यास सोपा जावा म्हणून प्रस्तुत लेखाचे तीन भाग केले आहेत. १. बायका. २. त्यांच्या वाईट संवयी. ३. त्यांवरील उपाय. लेखाचे तीन मुख्य भाग केले असले तरी तिसरा भाग वाचीत असतां प्रत्येकवेळीं दुसऱ्या भागांत संदर्भ पाहावा लागूं नये म्हणून दुसरा आणि तिसरा भाग एकमेकांत मोठ्या कौशल्यानें गुंफला आहे. एवढी प्रस्तावना मला वाटते पुरे. आतां मुख्य विषयास सुरुवात करतों.

### १. बायका

२. त्यांच्या वाईट संवयी. ३. त्यांवरील उपाय. वाचकहो, बायकांचा आणि माझा तसा विशेष परिचय नाहीं. मला स्वतःला एक बायको आहे आणि "हे पुरुष मेले इथून तिथून सारे सारखेच" या बायकांच्या ब्रीदवाक्याप्रमाणें "या बायका इथून तिथून साऱ्या सारख्याच" असें माझें स्वतःचेंहि मत आहे. तेव्हां साऱ्या बायका आमच्या हिच्याप्रमाणेंच असणार याबद्दल मला कांहीं शंका नाहीं. तेव्हां आमच्या हिला लागूं पडणाऱ्या साऱ्या गोष्टी इतर बायकांना सुद्धां लागूं पडणारच असें मी गृहीत धरून चालतों. असो. तेव्हां काय सांगत होतों—त्यांच्या वाईट संवयी आणि त्यावरील उपाय.

### १. उठल्यासुटल्या नवऱ्याला फालतू कामें सांगणें



बायकांची ही एक फार वाईट संवय आहे. म्हणजे त्यांचें कांहीं काम आम्हीं करूं नये असें माझें म्हणणें नाहीं. जरूर करावें आणि त्यांना खूष करून त्यांत सुख मानावें. मला स्वतःला पुष्कळदां असे वाटतें कीं शिवाजी महाराजांना कुणीसें वाघिणीचें दूध आणावयास सांगितलें तसें मला सुद्धां माझ्या बायकोनें वाघिणीचेंच नाहीं तरी निदान लांडगिणीचें अगर कोल्हिणीचें दूध आणावयास सांगावें, मी आपला जीव धोक्यांत घालून तें आणावें आणि तें मी आणल्यावर "खरंच, किती शूर आहांत गडे तुम्ही!" असें कांहींतरी तिनें म्हणावें. पण ती असें कधींच कांहीं सांगत नाहीं. त्याऐवजीं "बाहेर निघालांत कां! मग येतांना असे मार्केटावरून या आणि दोन पैशांची मिरच्या—कोथिंबीर आणि दोन पैशांचं आलं आणा." असें कांहींतरी सांगते. "थोडा कढीचा पाला आणि पुदिना सुद्धां मागा बरं का वर." असेंहि पुढें सांगायला कमी करीत नाहीं. (नशीब पुढें आणखी "थोडी तोंडली आणि वांगीं आणि कोबीचा एखादा लहानसा-किंवा जमल्यास मोठासा—कांदा सुद्धां मागा बरं का वर" असें सांगत नाहीं.) कधीं कधीं ती मला दुकानांतून मसाला किंवा साखर आणायला देखील सांगते. आमचा रमेश आतां मोठा झाला आहे म्हणून, नाहींतर तो लहान असतांना तर 'मी पातळ नेसतें तोपर्यंत याला जरा घ्या हं.' 'मी पावडर लावतें तोंपर्यंत याला जरा घ्या हं.' 'मी कुंकू लावते, तोपर्यंत याला जरा घ्या हं.' 'मी अमकं करतें तोपर्यंत याला जरा घ्या हं.' 'मी तमकं करतें तोंपर्यंत याला जरा घ्या हं,' असें दिवसभर चालत असे.

या संवयीवर उपाय—

या संवयीवर कांऽहीं उपाय नाहीं.

### २. मिनिटामिनिटाला पदर सांवरणें

ही संवय जिला नाहीं अशी स्त्री मी तरी अजून पाहिलेली नाहीं. मुलगी साधारणपणें पातळ नेसूं लागली कीं ही संवय तिला लागते, ती म्हातारी होईपर्यंत आणि उजव्या हातांत थोडें त्राण शिल्लक असेपर्यंत टिकतें. ही संवय तिला कशी लागते परमेश्वरालाच माहीत. (कुणीसें म्हटलें आहे, 'पहांट झाली कीं कोंबडा कां आरवतो! वसंत ऋतू आला कीं कोकिळा कुहू कुहू कां करूं लागते! सोळावें वर्ष लागलें कीं मुलगी पदर कां सांवरूं लागते!' कदाचित् या प्रश्नाला उत्तर नसेल.) आतां बायकांनीं परक्या पुरुषासमोर पदर सांवरला तर गोष्ट निराळी. पण आपल्या नवऱ्यासमोर सुद्धां सतरा वेळा पदर सांवरण्याचें कारण काय! आमची ही माझ्यासमोर सुद्धां एकसारखा पदर सांवरीत असते. वास्तविक त्या पदरामागें ब्लाऊज असतो, त्या ब्लाऊजमागें बॉडी असते आणि त्या बॉडीमागें— तेव्हां मी असें म्हणतों हें सारें मला माहीत असतां तें सारखें पदराआड लपविण्याची गरज काय!

बरें, पदर सारखा ढळतो तर मग आम्हीं टायला पिन लावतो किंवा पॅन्टला बकल लावतो तशा या बायका पदराला एखादी पिन कां लावीत नाहींत ! परमेश्वरालाच माहीत. (आमच्या हिला मी एकदां हा प्रश्न विचारला होता. ती काय म्हणाली माहीत आहे ? ती म्हणाली, 'इश्श !' म्हणजे काय ? तें सुद्धां परमेश्वरालाचें माहीत.)

या संवयीवर उपाय—

या संवयीवर कांऽहीं उपाय नाहीं.

## पातळांतून परकर डोकावतों कीं काय ? हें पाहणें

पांचवारी पातळ नेसणाऱ्या प्रत्येक स्त्रीला ही संवय हमखास असते. मी स्वतः बुलन पॅन्ट घातल्यानंतर आंतील लेंगा खालून बाहेर डोंकावतो आहे कीं काय हें कधीं पाहिल्याचें मला आठवत नाहीं. पण आमची ही मात्र पातळ नेसल्यानंतर परकर खालून बाहेर डोंकावतो आहे कीं काय तें आधीं पाहील. ठीक आहे. एकदां पाहिलें तर माझें कांहीं म्हणणें नाहीं. पण थोडया वेळानें पुन्हां पाहील. मग पुन्हां पाहील. मग पुन्हां. जिना उतरतांना सुद्धां मान वांकडी करीत करीतच उतरेल. जिना उतरून खालीं गेल्यानंतर पुन्हां मान वांकडी करून पाहील. बाहेर रस्त्यावर गेल्यावर पुन्हां एकदां मान वांकडी करून पाहील. स्टेशनवर पोहोंचल्यानंतर सुद्धां ती तसें करते कीं काय याची मला कल्पना नाहीं. मी म्हणतों, परकर जर असा बाहेर डोकावतो आणि तो डोकावूं नये असें यांना वाटतें तर मग त्या तो थोडा तोकडा कां शिवत नाहींत ! बरें, एकदां एखादा परकर तोकडा असल्यामुळें तो पातळा-बाहेर डोकावत नाहीं हें समजल्यानंतर रोज रोज तें पाहण्याची गरज काय ! आमची ही रोज कॉलेजमध्यें निघाली कीं हा प्रकार मला पहावयास मिळतो. (वाचकहो, तुमची ही कॉलेजमध्यें जाते कीं नाहीं मला माहीत नाहीं. पण आमची ही जाते. गेलीं पांच वर्षें ती कॉलेजला जात आहे. यंदा ती इंटरला आहे. हिशेब जुळत नाही. खरं ना ? पण बायकांच्या बाबतींत हा हिशेब असाच असतो. तुमचा काय अनुभव आहे ?)

या संवयीवर उपाय—

या संवईवर कांऽहीं उपाय नाहीं.



## उठल्यासुटल्या 'इश्य' 'किनई' शब्दांचा प्रयोग

आमच्या हिला उठल्या सुटल्या हे शब्द वापरण्याची फार संवय आहे. आमच्या ऑफीसमध्यें एखादी गंमत झाली तर घरीं आल्यानंतर मी हिला म्हणतो, 'नन्दू, अग आज ऑफीसमध्यें एक गंमत झाली. आमच्या मॅनेजरनें एका कारकुनाला कांहीं खाजगी काम सांगितलं. तेव्हां—' वगैरे. अगदीं सरळ. सुटसुटीत शब्दांत. पण तेंच जर हिला मला एखादी गंमत सांगायची असेल तर ती अशी सांगते. 'ऐकलं का, आज किनई आमच्या कॉलेजमध्यें किनई एक गंमत झाली. आमच्या सरांनीं किनई एका मुलीला एक प्रश्न विचारला. तर तिनें किनई—' वगैरे. म्हणजे प्रत्येक वाक्याला कमीत कमी एक 'किनई.' आतां आमच्या हिचा आवाज फार गोड असल्यामुळें हा 'किनई' शब्द मला अगदीं सनईसारखा वाटतो ही गोष्ट वेगळी. दुसरा शब्द 'इश्श.' उदाहरणादाखल एक गंमत सांगतों. एकदां रात्रीं मी झोंपलो असतां साधारण अकराच्या सुमाराला मला बायकोनें हलवून उठविलें. 'काय ग ? काय झालं ?' मी विचारलें. 'कांहीं नाहीं,' ती म्हणाली. 'मग ? उठवलंस कशाला मला ?' मी विचारलें. 'इश्श !' ती म्हणाली. 'अग इश्श काय ? उठवलंस कशाला मला ?' 'इश्श !' 'कांहीं हवं आहे का तुला ?' 'इश्श !' 'कांहीं झालं का ?' 'इश्श' 'बरं वाटत नाहीं का ?' 'इश्श' 'झोंप येत नाहीं का तुला ?' 'इश्श !' 'असं नुसतं असं इश्श इश्श काय करतेस ? कांहीं बोल ना-' 'इश्श !' यावेळीं 'इश्श' म्हणतांना ती हळूंच माझ्या कुशींत शिरली. आतां सारा प्रकार माझ्या ध्यानांत आला. पहा, किती साधी गोष्ट. पण त्या करतां ती निदान आठ-दहा वेळां तरी 'इश्श' म्हणाली असेल. असेंच आणखी 'अगबाई !' 'बरं का.' 'चला, कांहींतरीच.' 'अय्या !' वगैरे बरेच शब्द आहेत. तुमच्या ऐकिवांत ते असतीलच म्हणा.

या संवयीवर उपाय.

या संवयीवर कांऽहीं उपाय नाहीं.

## हातांत मिळेल ती वस्तू अंबाड्यांत खोंचून ठेवणें

तुमची ही अंबाडा घालीत असेल तर ही संवय तुमच्या खास परिचयाची असेल. अंबाडा ही परमेश्वरानें स्त्रीला दिलेली एक देणगी आहे. अंबाडा घातल्यानंतर स्त्री अधिक सुंदर, अधिक रुबाबदार, अधिक भारदस्त दिसते. पण या अंबाड्याचा त्या करीत असलेला हा दुरुपयोग पाहिला कीं मन कळवळतें. एखादा कपडा ठेवायला जागा नसली म्हणजे तो आपण खुंटीवर टांगून ठेवतों. बायकांच्या बाबतींत मी असें पाहिलें आहे कीं कोणतीहि वस्तु ठेवायला जागा नसली अगर ती वस्तु जागच्या जागीं ठेवण्याकरतां बसल्या जागेवरून उठण्याचा कंटाळा आलेला असला कीं त्या ती वस्तु अंबाड्यांत खोंचून ठेवतात. सुया आणि टांचण्या या म्हणजे आमच्या हिच्या अंबाडयांत नेहमीं सांपडणाऱ्या चिजा. पिना आणि आंकडे यांचें तर अंबाडा हें माहेरघरच आहे. पण या पिना आणि आंकडे ही अंबाडयांत अशा कांहीं उलट सुलट खोंचून ठेवते कीं कधीं कधीं तिच्या डोक्यावर टपली मारल्यानंतर त्या हाताला टोंचल्याशिवाय राहत नाहींत. (वाचकहो, तुम्ही तुमच्या बायकोच्या डोक्यावर कधीं टपली मारतां कीं नाहीं मला माहीत नाहीं. पण माझ्या बायकोच्या डोक्यावर मात्र मी येतां जातां टपली मारतों. फार मौज असते त्यांत. तुम्ही सुद्धां हा प्रयोग एकदां जरूर करून बघा. म्हणजे तुमच्या स्वतःच्या बायकोच्या डोक्यावर. माझ्या नव्हे. विशेषतः आपण टपली मारल्यानंतर 'इश्श ! हा काय मेला चाऽवट-पणा !' असें ती म्हणाली तर मग काय विचारूच नका.) तर मी काय म्हणत होतों-हाताला टोंचल्या शिवाय राहत नाहींत. सुया आणि टांचण्या जास्त जोरानें टोंचतात. हिच्या अंबाडयांत गुलाबाचे देंठ सुद्धां अनेकदां सांपडतात. गुलाबाच्या फुलांची हिला भारी हौस. तीं ती देंठांसकट अंबाडयांत घालते. या फुलांच्या पाकळ्या कांहीं वेळानें

एक एक करून गळून जातात. आणि नुसता देंठ शिल्लक राहतो. दुःखाची गोष्ट अशी कीं या देठांना कांटे असतात आणि ते आंकडे अगर पिना यापेक्षां जास्त तीव्रतेनें टोंचतात. असो.

या संवयीवर उपाय—

या संवयीवर कांऽहीं उपाय नाहीं.

## पुस्तकांच्या पानांची टोकं मोडणें




ही बायकांची एक स्पेशालिटी आहे. एखादें पुस्तक त्यांनीं वाचायला घेतलें कीं तें संपविण्यास त्यांना निदान महिना तरी लागतो. त्या पुस्तक वाचीत असल्या कीं मधेंच 'बाळ उठला वाटतं!' किंवा 'भाजी करपली वाटतं !' किंवा 'आई, अरुणा वहिनी आल्या आहेत !' किंवा 'कल्ह्यो लावाऽची, कल्ह्योऽऽ–' असें कांहींतरी कारण घडतें आणि त्यांना वाचन थांबवावें लागतें. मग त्या अकरावें पान वाचीत असल्या तर खुणेसाठीं म्हणून त्या बिचाऱ्या अकराव्या पानाचें टोंक दुमडून ठेवतात. वाचनालयांतून आणलेल्या पुस्तकांचं सुद्धां त्या असेच हाल करतात. हें दुमडलेलें पान पुन्हां वाचन सुरूं करतांना त्या उलगडतात व वाचन बंद करतांना पुन्हां दुसरें पान दुमडतात. अशा तऱ्हेनें एखादें पुस्तक दहाबारा बायकांनीं वाचलें म्हणजे त्याच्या बहुतेक पानांचीं टोकें दुमडलीं जातात. ( विशेष म्हणजे या प्रकाराचें त्यांना कांऽहीं वाटत नाहीं. पातळाला घडी पडली तर मात्र त्यांचा जीव नुसता वर खाली होतो. )

या संवयीवर उपाय—

या संवयीवर कांऽहीं उपाय नाहीं.

## नवऱ्याला सतत शंका विचारीत राहणें

आपला नवरा म्हणजे प्रत्यक्ष परमेश्वरच आहे. त्याला सर्व कांहीं ठाऊक असतें अशी सर्वच बायकांची कल्पना असते. निदान माझ्या बायकोची तरी तशी कल्पना आहे. ती नेहमीं मला कांहींतरी विचारीतच असते. कधीं लिहित बसली असेल आणि मी जवळच आरामखुर्चीत वाचीत बसलों असेन तर मधेंच विचारेल, 'उसामधल्या 'उ' वर अनुस्वार देतात कां हो ?' वास्तविक त्या उ वर तिनें एक नव्हे दोन अनुस्वार दिले तरी माझी त्याला कांहींच हरकत नसते. रमेशला कधीं भूगोल शिकवीत असली तर मधेंच मला विचारेल, 'कोमिंटाँग नदी कुठून वहाते हो ?' आतां कोमिंटाँग ही नदी आहे कीं कुत्र्याचीं एखादी जात आहे हें सुद्धां मला माहीत नसतें. मग ती कुठून वहाते हें मी काय कपाळ सांगणार ! हिला घेऊन कधीं इंग्रजी सिनेमाला जायची तर सोयच नाहीं. एखादा चांगला विनोद असला कीं ज्यांना तो समजतो ते लोक हंसूं लागतात. ते हंसूं लागले कीं मग ज्यांना तो समजत नाहीं ते लोक आपल्याला तो समजला नाही हें इतरांना समजूं नये म्हणून हंसूं लागतात. मी बहुधा या दुसऱ्या प्रकारांत मोडतो. पण अशा वेळीं हंसण्याचा धबधबा बंद होऊन सगळीकडे शांतता पसरली कीं बायको हटकून मला विचारते, 'काय झालं हो ! कां हंसलांत एवढें ?' मूर्ख कुठली ! हा काय प्रश्न झाला ? म्हणे 'कां हंसलांत ?' कां हंसलों म्हणजे ? सगळे हंसले म्हणून मी हंसलों. आपणहि हंसायचें तें सोडून मूर्खासारखी 'कां हंसलांत ?' असें मलाच विचारते. हे नये पैसे आल्यापासून तर हिनें मला अगदीं भंडावून सोडलें आहे. 'साडेसात आण्यांचे पैसे किती हो ?' 'एकोणसाठ नया पैशांचे आणे किती हो ?' असे दिवसभर चाललेलें असतें. आतां ही नया पैशांची भानगड मला स्वतःला सुद्धां अजून नीट कळत नाहीं. 'अग एक दोन पैसे इकडे तिकडे झाले तर काय बिघडतं ?' असें म्हणून मी वेळ मारून नेतो.



या संवयीवर उपाय—

या संवयीवर कांऽहीं उपाय नाहीं.

●●●





अनुक्रमणिका




चुरचुरीत, खुसखुशीत आणि खमंग फरसाण

## बायकोचा संशय

तुम्ही कुठें बाहेरगांवीं गेला असाल आणि येतांना बायकोसाठीं एखादी भेट आणायला विसरलात तर ती म्हणेल, 'तुमचं मेलं माझ्यावर प्रेमच नाहीं राहिलं पूर्वीसारखं.'

तुम्ही जर कांहीं भेट आणलीत तर त्याबद्दल तिला संशय येईल.

तुम्ही ऑफीसमधून उशीरा घरीं आलात कीं उशीर कां झाला असें ती तुम्हांला विचारील. तुम्हीं खरें कारण सांगितलें तर तिचा त्यावर विश्वास बसणार नाहीं. तुम्हीं खोटें कारण सांगितलें तर खरें कारण शोधून काढल्याशिवाय ती राहणार नाहीं.

तुम्हीं रात्रीं घरीं येतां तेव्हां अगदीं उत्साहांत आणि खुषींत असाल तर तुम्हांला काय हवं आहे तें तिला समजतें. तुम्ही थकून भागून घरीं आलात तर तें तुम्हांला अगोदरच बाहेर कुठेंतरी मिळालेलें आहे असें तिला वाटतें.

थोडक्यांत–कांहींहि केलेंत तरी तुमच्या बायकोचें समाधान कधीं होणार नाहीं.

\+ + +

## नवऱ्याच्या डोक्यांत दांडका !

आपल्या नवऱ्याच्या डोक्यांत दांडका घातल्याबद्दल एका बाईवर खटला चालला होता. ज्यूरीमध्यें सर्व स्त्रियाच होत्या. त्यांचें आपापसांत झालेलें बोलणें असें:—

**पहिली :** दिसतेच आहे मेली खुनशी.

**दुसरी :** मलासुद्धां तसंच वाटतं. केंस बघा कसे बांधले आहेत मेलीनें.

**तिसरी :** तो किती गरीब दिसतोय बिचारा.

**चवथी :** कमाल आहे बाई. आपल्या नवऱ्याच्या डोक्यांत दांडका मारवला तरी कसा तिच्यानें, खुनी मेली.

**पांचवी :** कानांतले डूल खरे आहेत कां हो तिच्या ?

**सहावी :** हो ना. कुठून पैसे आणते मेली कुणास ठाऊक. मला वाटतं—

**सातवी :** सांगायलाच नको तुम्ही. तोंडावरूनच चवचाळ दिसते आहे सटवी.

**आठवी :** केल्या कर्माबद्दल पश्चात्ताप सुद्धां झालेला दिसत नाहीं मेलीला.

**नववी :** क्रूर मेली.

**दहावी :** शिक्षा झालीच पाहिजे मेलीला.

**अकरावी :** मला सुद्धां तसंच वाटतं.

**बारावी :** मी सुद्धां अगदीं तेंच म्हणतें.

यानंतर त्या बाईनें कोर्टांत स्वतःची हकीकत सांगितली.

' जज्जसाहेब आणि ज्यूरींतील स्त्रियांनों, मी माझ्या नवऱ्याच्या डोक्यांत दांडका कां घातला माहीत आहे ? सांगते. दर शनिवारी रात्रीं तो घरीं आला म्हणजे मला जबरदस्तीनें आपल्याला आंघोळ घालायला लावीत असे.'

'पण म्हणून त्याच्या डोक्यांत दांडका मारायचं काय कारण ?' न्यायाधिशांनीं विचारलें.

'कारण गेल्या शनिवारी रात्रीं तो घरीं आला तेव्हां त्यानें आंघोळ केलेली होती, साहेब.'

ज्यूरीचा निकाल ? आरोपी निर्दोष.

× × ×

## त्यागी कोण ?

एका मोठ्या श्रीमंत आणि विद्वान गृहस्थाची एका महात्म्याशीं मुलाखत झाली. प्रस्तूतचे महापुरुष मोठे त्यागी होते.

त्या श्रीमंत गृहस्थांनीं त्या साधु पुरुषाला लंगोटीचें कापड देऊं केलें, परंतु त्याची त्याला जरुरी नसल्यामुळं त्या साधुपुरुषानं तें घेतलं नाहीं.

त्या महात्म्याशीं कांहीं काळ बोलत राहिल्यावर त्या श्रीमंत माणसाच्या मनांतहि वैराग्याची भावना उत्पन्न झाली, आणि त्याला त्यागाचें महत्त्व कळलें. तो त्या महात्म्याला म्हणाला, " स्वामी महाराज, आपण आणि आपला त्याग खरोखर धन्य आहे !'

यावर मोठ्या विनयी स्वरांत तो महात्मा म्हणाला, बाबा रे, लोक मला कितीहि त्यागी म्हणोत, खरं म्हणजे मी अगदीं स्वार्थी आहे. त्यांतून आतां तुमच्यासारखा सुशिक्षित माणूस मला त्यागी कसं म्हणतो तेंच मला समजत नाहीं. मी तर सदैवच माझ्याजवळ राहील अशा सर्वोत अमोल वस्तूची इच्छा करतो आणि म्हणूनच मी संसारांतील साऱ्या विनाशी वस्तू टाकून दिल्या आहेत. वस्तुतः त्यागी तर तुम्हीं आहांत कारण खरी वस्तू काय आहे हें कळल्यावरही तुम्हीं तिच्याकरितां कांहीं प्रयत्न करूं पाहात नाहीं.'

\+ + +

## श्रीमंत होण्याची गुरुकिल्ली

' चैतन्य ' वर्तमानपत्राचे वार्ताहर श्री. बाळकोबा धनमलशेठच्या घरीं दुपारी त्यांची मुलाखत घ्यायला गेले. ' आपण श्रीमंत कसें झालांत ? त्याची गुरुकिल्ली कशांत आहे ? ' हा मुलाखतीचा विषय होता. धनमलशेठ हिशेब तपासत असल्यामुळें बाळकोबांना बाहेर थांबावं लागलं. तिन्हीसांजेच्यावेळीं शेठ बाहेर आले व बाळकोबांना म्हणाले,

' तुम्हीं दुपारी आलांत तेव्हांच मी बाहेर आलों असतो पण गप्पांत वेळ जाऊन मग मला रात्रीं हिशेब तपासावे लागले असते व विनाकारण दिवाबत्तीचा खर्च वाढला असता. परंतु आतां तुम्हीं लवकर प्रश्न विचारा हं. कारण अंधार इतक्यांत पडूं लागेल मग उगाच दिवा लावायला लागेल तेव्हां आपलं तिन्हिसांजेच्या उजेडी उरकून टाका. ती कोपऱ्यांत पडलेली चिटोरी घ्या व त्याच्यावर लिहा.

तुम्हीं उगीच अख्खा कागद कशाला नासतां ? आणि मुलाखत फार लांबवूं नका हं ! नाहींतर फार बोलल्यामुळें माझ्या घशाला कोरड पडेल व लिंबूपाणी पिण्याचा मला खर्च करावा लागेल. हं, आतां तुम्हांला काय विचारायचं आहे ? '

' कांहीं नाहीं शेठजी ' बाळकोबा उठत म्हणाले, ' तुमच्या यशाची गुरुकिल्ली कळली मला ' व पेन्सिल खिशांत ठेवीत ते पुढें म्हणाले, ' आपली हरकत नसेल तर मी आतां मुलाखत घेत नाहीं, तेवढंच शिसं वांचेल.... अच्छा ! '

× × ×

## तुमच्या सामान्य ज्ञानाची चांचणी

१) भारतावर राज्य करणारी पहिली स्त्री... ?

२) जगांतला सर्वात मोठा बोगदा... ?

३) क्रिकेटच्या ' पिच 'ची लांबी... ?

४) माणसाच्या शरीराचें साधारण उष्णतामान... ?

५) जगांतलीं पांच मोठी शहरें... ?

६) सूर्याचें पृथ्वीपासूनचें अंतर... ?

७) हत्ती सोंडेनें पाणी पितो... ?

८) जपानच्या राजाचें नांव... ?

९) हिंदुस्थानच्या पहिल्या व शेवटच्या व्हॉईसरॉयचें ( परकीय ) नांव... ?

१०) ग्रिनिच वेळ आणि हिंदी वेळ ह्यांतील अंतर... ?

११) ' मर्क्युरी 'चें दुसरें नांव... ?

१२) भारतांतील सर्वात जास्त लोकसंख्या असलेलें राज्य.

१३) दांत जास्त कुणाला ? कुत्र्याला कीं माणसाला ?

१४) हिंदी राष्ट्रीय महासभेचा स्थापक... ?

१५) ' युनिकॉर्न ' म्हणजे काय ?

१६) केस कापतांना अथवा नखें काढतांना आपल्याला त्रास होत नाहीं...!

१७) संयुक्त राष्ट्र संघाचे (UNO) सभासद...?

१८) टपाल-तिकिटावर स्वतःचें नांव न छापणारा देश ?

१९) भारतांतील इंजिनांचा कारखाना ?

२०) भारतांत तिसऱ्या वर्गाच्या प्रवाशाला जास्तींत जास्त इतकें सामान तिकिटाविना नेतां येते...?

उत्तरें पान ५३ वर पहा



सि लि क च्या क था



# भा जी

**माणेकशा** आमच्या हैद्राबादेंतील जुना दारूचा व्यापारी. निजामाची सरंजामी राजवट गेली अन् लोकांना जबाबदार असलेलें मंत्रिमंडळ आलें. पुढें हैद्राबादचें विभाजन झालें आणि बरीच खांदेपालट झाली. परंतु माणेकशाच्या दृष्टीनें निजामी जमान्यांतच बरकत आणि सुख होतें. हा व्यापारी खापड आपलें हें मत स्पष्टपणें मांडण्यांत कधीं भ्यायचा नाहीं. त्याचा दारूचा व्यापार मुख्य असला तरी इतर अनेक धंदे होते त्याचे आणि त्या निमित्तानें त्याचे अनेकांशीं संबंध यावयाचे. आलेले संबंध दृढ व्हावेत असें त्याचें वागणें असायचें.

अशीच कांहीं मंडळी आज त्याच्याकडे दावतीस सांजला येणार होती. साऱ्यांचीं कामें आटोपली होती आणि खान्यापर्यंत काय करावयाचें म्हणून फिरावयास निघाली. फिरता फिरता ती सुलतान बाजारांत आली तेव्हां रस्त्याच्या एका बाजूला भाज्या विकणाऱ्या बाया दिसल्या. प्रत्येकाच्या पुढ्यांत ताजी भेंडी होती.

' भेंडी मला फार आवडतात. तीं आरोग्याला पोषक तर असतातच शिवाय दिसायला सुरेख असतात. इंग्रज खरेच रसिक. त्यांनीं या भाजीस ' रमणीचीं बोटें ' असें यथार्थ नामाभिधान दिलें. '

' तुझीहि कमालच आहे. ' लेडी ' म्हणजे रमणी काय ? '

' मग काय लेडी म्हणजे बाई म्हणायचें ? ' बाईचीं बोटें ' असें उच्चारावयास देखील कसेंसेंच वाटतें--'

पुण्याचा सुभाष आणि नागपूरचा यशपाल यांचा त्या नवख्या ठिकाणचा वरील संवाद पुढें प्रगती करूं शकला नाहीं. कारण भाजीमार्केटांत भाजी घ्यावयास आलेल्या इतर स्त्रियांचें आपल्या बोलण्याकडे लक्ष वेधलें जात आहे हें बरें नसल्याचें त्यांच्या ध्यानांत आलें. मी त्यांच्याबरोबर होतो आणि माझ्याबरोबर तेलंगणाचा गोपाळ आणि गोव्याचा श्रीपाद होता. परंतु भाजीवाल्यांची ती रांग ओलांडल्यावर सुभाषनें पुन्हां त्या विषयाला तोंड फोडलें. आणि गोपाळला विचारले, ' मिस्टर, तुम्हांला काय वाटतें ? ' तुमचा वाद नक्की कोणत्या मुद्यावर आहे तें कांहीं कळलें नाहीं. परंतु भेंडी या वनस्पतींत फक्त इंग्रजी नांवाखेरीज कांहीं रमणीय आहे असें मला नाहीं वाटत. माझ्या आवडीबद्दल विचाराल तर मला गुडमाकायलू फार आवडतात. तुमच्याकडे मिळत नसावेत. आमच्या येथें बारा मास मिळतात. दुकानांत तांबूस-पिवळसर रंगाच्या गुडमाकायलूच्या राशी पाहिल्या कीं मला हमखास उन्नत वक्षांची आठवण होते. ज्या इंग्रज माणसानें भेंडीस ' रमणीचीं बोटें ' संबोधलें, त्यानें आमचें गुडमाकायलू पाहिलें असतें तर नक्कीच ' लेडीज ब्रेस्ट्स ' असें नामकरण करून त्यानें आपल्या रसिकतेची ग्वाही दिली असती...

धंद्याकरतां हैद्राबादी स्थायिक झालेला श्रीपाद म्हणाला, 'या गोपाळच्या नादी लागला तर विषय संपणार नाहीं. तेलंगणाच्या या जमीनदाराच्या पदरी द्रुत काळाची गति मंदावते.

विचारा माणेकशा आपली वाट पहात असेल. लक्षांत आहे ना कीं आज संध्याकाळीं आपला त्याच्याकडे प्रोग्रॅम आहे. आपण वायफळ गप्पांतच वेळ दवडूं लागलों तर कार्यक्रमाची रंगत कमी होईल. शिवाय त्यानें मला आज मजकडे आणलेला नीरफणस आणावयास सांगितलें आहे. तो घरीं जाऊन आणावयाचा आहे. त्याच्या काचऱ्या काय फर्मास लागतात...'

मी विचारलें, ' नीरफणस काय भानगड आहे ? '

' अरे ही आमच्या गोव्याकडची खास भाजी आहे. '

' फणसासारखाच असतो काय ? '

' कांहीं अंशी तसं म्हणता येईल. आकारानें लहान असतो. रंगानें हिरवा दिसतो. त्याची नक्की कल्पना तुला कशी द्यावी ? तो दिसायला जरा लांब वर्तुळाकार असतो. तारुण्यानें मुसमुसणाऱ्या युवतीचें पुष्ट नितंब डोळ्यांपुढें आण म्हणजे कल्पना येईल...' यावर मी अधिक विचारलें नाहीं.

संध्याकाळीं सगळे लोक जमलों. माणेकशानें आपला दोस्त उस्मानची आमच्याशीं ओळख करून दिली. जहागीर गेलेला उस्मान माणेकशाचा रेस-मित्र होता.

पेयाचे घोट घेत गोपाळ म्हणाला, ' अरे फिंगर-चिप्सके बगैर मजा नहीं ' तळलेले बटाट्याचे काप पुढ्यांत येतांच यशपाल बोलला, ' बटाटा साला खायला बरा पण त्याच्या-इतकी बेढब आकाराची सब्जी शोधून सांपडणार नाहीं...' 'लाव, गनपावडर-' गोपाळ म्हणाला आणि साऱ्यांना क्षणभर वाटलें कीं गोपाळला ' चढली. ' पण त्याला लाल तिखट हवें होतें. बटाट्याच्या कापावर लाल तिखटाचा थर जमल्यावर जेव्हां गोपाळ त्यावर लिंबू पिळू लागला तेव्हां उस्मान पुकारला, ' हां, हां, ठेहरो. लिंबू नका वापरूं, सारा असर जाईल, मजा बिघडेल-'

' अरे, चल बे, लिंबू-कैरी आपना कुछ नही बिघाड सकती...'

माणेकशा मात्र तळलेले झिंगे खात घशाखाली ग्लास रिकामा करत होता. त्यास सुभाष म्हणाला, ' बटाट्याचे काप तुम्हांला आवडत नाहीं काय ? ' यावर माणेकशा घोगऱ्या आवाजांत म्हणाला, ' मी कोणतेंच व्हेजिटेबल खात नाहीं व्हेजिटेबलने आदमी नादान होते...'

ही सारी मंडळी प्रत्यक्ष जेवावयास बसली तेव्हां त्यांना 'होश' गायब होण्याच्या बेतात होता...

' माणेक, आज बगारा बैंगन हवा होता... याऽऽद है, खुल्दाबादच्या डाकबंगल्यांत हसीनाने किती प्यारसे बगारा बैंगन खिलवला होता...होऽऽऽता...' असें म्हणत उस्मान टेबलावरच मान टाकूं लागला.

यशपाल विचारत होता, आतां निजामाच्या त्या शंभर राण्या काय करत असतील ? त्या म्हणे, आंजकाल भाजी विकतात ?' गोपाळानें यशपालला ढोंसलें. कच्ची ककडी खाव तो जिसकी गरमी कम होगी...'

माणेकशा गड्याला सूचना देत होता, ' आरमका बंदोबस्त हुवा है ! तो सबको लिटा देना—'

गडी माणेकशाच्या कानांत कुजबुजला तरकारी बेचनावली माणिक आयी है-' माणेकशाने त्याला खुणावलें तसं सारं उमजल्याच्या आविर्भावांत तो हळूंच हंसत पुटपुटला, 'तरकारी उपरके कमरेमें रखनेको फर्माता हूँ...'

'कंबऽऽऽऽखत...' माणेकशा पुटपुटला.

( **टीप :** पॉप्युलर प्रकाशनतर्फे प्रकाशनाच्या वाटेवर असलेल्या आगामी कथासंग्रहांतून)

●●●

## तूं माझा गिऱ्हाईक नाहींस

आवडाबाईचा नवरा नामदेव आपल्या सबंध आयुष्यभर एका हॉटेलमध्यें वेटर म्हणून काम करीत होता. तो मेल्यानंतर दुसऱ्या दिवशीं आवडाबाईनें त्याला 'प्लॅन्चेट'वर बोलाविण्याचा प्रयत्न केला. बराच वेळ झाला तरी नामदेव कांहीं 'प्लॅन्चेट'वर येईना; म्हणून आवडाबाई खूप चिडली व चिडक्या स्वरांत केकाटली, ' तूं 'ओ' कां देत नाहींस?' यावर-

धीरगंभीर आवाजांत नामदेव म्हणाला, 'तूं माझ्या टेबलावरील गिऱ्हाईक नाहीं!!'

× × ×

...पान ५२ वरून

## सामान्य ज्ञानाचीं उत्तरें—

१) सुल्ताना रझिया बेगम.
२) स्वित्झर्लंड आणि इटलीमधला सिम्प्लन बोगदा हा १२ मैल ४५० यार्ड लांब आहे.
३) २२ यार्ड.
४) ९८.४ डिग्री.
५) लंडन, न्यूयॉर्क, टोकियो, बर्लिन आणि चिकागो.
६) ९३,०००,००० मैल.
७) मुळींच नाहीं. हत्ती सोंडेनें पाणी आंत घेतो आणि मगच तोंडांत सोडतो.
८) मिकॅडो.
९) पहिला व्हॉईसरॉय-लॉर्ड कॅनिंग, शेवटचा व्हॉईसरॉय-लॉर्ड माऊंटबॅटन.
१०) साडेपांच तासाचे. हिंदी वेळ, ग्रिनिच वेळेपेक्षां ५॥ तासांनीं पुढें असते.
११) क्विक सिल्व्हर [ Quick Silver ]
१२) उत्तर प्रदेश.
१३) कुत्र्याला. माणसाला बत्तीस दात असतात तर कुत्र्याला ४२.
१४) ए. ओ. ह्यूम ह्यांनीं.
१५) हें एक शिंग असलेलं कल्पित जनावर आहे. त्याचं डोकें आणि शरीर घोड्याचें असतें-आणि त्याच्या कपाळावर लांब, अणकुचीदार शिंग असतं.
१६) कारण तेथपर्यंत ज्ञानतंतू पोहोंचलेले नसतात.
१७) एकशेंदहा.
१८) इंग्लंड.
१९) चित्तरंजन ( बंगाल ) येथें.
२०) बंगाली २५ शेर.











**भीष्माच्या डोंगर**

...पान १६ वरून

येऊं दिलं नाही. तिकडे तुझं काम नाहीं, फुकट आम्हाला बोलण्यांत मात्र व्यत्यय, असं सांगून मागं परतवलं.'

विजयनं सांगण्याचा खूप प्रयत्न केला, 'पण मामा त्यांनीं बोलवलंय् मला.'

ही सबब अण्णागुरुजी थोडीच ऐकून घेणार! तो तडकला, 'अक्कल आहे तुझ्या मॅनेजरला! असती तर माझ्याबरोबर त्यानं तुला बोलावलं नसतं. अरे, या राजकारणांत तुझ्या शिक्षणाचा उपयोग नाहीं. मॅनेजराला सांगतों मी–काय!'

आणि नेटानं काठी टेकत म्हातारा तरातरा निघून गेला–झपाटल्यासारखा, नादावल्यासारखा.

मागं विजय बराच वेळ मामाकडे बघत उभा होता. ती म्हातारी आकृति समोर नारळीच्या बागेंत अदृश्य झाली तसा त्यानं एक दीर्घ निःश्वास सोडला. त्याला आवडलं नव्हतं. वाईट वाटलं त्याला. उगाच मन बैचैन झालं, उदास झालं. न जाणे कसली–नुसतीच रुखरुख लागून राहिली...त्याचा मामा बदलला होता. होय, अखेर अण्णागुरुजी सुद्धां बदलला होता.

गांव बदललं होतं...आणि बदलतच होतं.

चार महिन्यांत सगळं कसं पार उलटं पालटं झालं होतं. गांव डोक्यावर, म्हणजे भीष्माच्या डोंगरावर नाचूं लागलं होतं. रत्नागिरी जिल्ह्याच्या टांचेखालीं अंग चोरून कसाबसा जीव बचावून असलेलं एक टीचभर खेडं. कंपनी आल्याबरोबर एकाएकीं ही बेडकी पोट फुगवूं लागली होती. डोंगरावरील जमिनीची गोऱ्या तज्ज्ञांकडून पहाणी होऊं लागली. आणि भीष्माच्या उदरांत गडप झालेल्या एकएक गौडबंगालाचा घडाधड शोध लागूं लागला. मॅंगनीज तर होतंच–दोन-चार पिढ्या पुरून उरेल इतकं. आणि त्याच्या खाली, खोल तळाशीं-इथं ह्या विलायतच्या साहेबांचं सुद्धां एकमत नव्हतं—मतभेद होते. कोणी म्हणत कोळसा आहे, कोणी तांब्याचं नांव घेई आणि एकानं तर डोळे झांकून दडपून दिलं होतं, सोनंच असलं पाहिजे. पुण्यामुंबईकडल्या वृत्तपत्रांत या बातम्या गेले चार महिने उलटसुलट प्रसिद्ध होत होत्या. चार आठ दिवसांनीं त्या मग गांवाला कळत आणि गांवचे डोळे तसे पांढरे होत.

उभा पावसाळा हें असं चाललं होतं. कंपनीच्या खाणी चालू होत्या, पण किरकोळ प्रमाणावर. सुरवातीला जोर नव्हता. दरम्यान वर डोंगरांत दोन रस्ते झाले. कंपनीनंच केले. पाण्यासारखा पैसा ओतून. गांवच्या या टोकापासून त्या टोकापर्यंत–एक उभा, दुसरा आडवा. खालीं गांवांत मात्र बैलगाडी सरळ जाईल इतक्या बेताचा एक सुद्धां रस्ता नव्हता. डोंगराच्या तळपीवर सिमिटाच्या सफेत पत्र्यांची एक जंगी शेड कंपनीनं बांधली. लागूनच मावळतीला उतारावर खाणी होत्या. दोन मैलांवर, खालीं समुद्रकिनाऱ्याला, किल्ल्यापाशीं अशीच दुसरी मोठीं शेड उठली होती. खाणींतून निघालेल्या मॅंगनीजच्या मालाचा साठा या शेडमध्यें करीत. किनाऱ्यावर एक तात्पुरता धक्का बांधण्याचं काम सुद्धां सध्यां जोसांत चाललं होतं. नोव्हेंबर-डिसेंबरपर्यंत विलायतहून बोटी यायच्या होत्या. मॅंगनीजसाठीं. म्हणून पडावं तरी लावता येतील अशा बेताचा एक धक्का कंपनी बांधत होती. या दोन होडीच्या दरम्यान कंपनीच्या ट्रकांची वर्दळ अहोरात्र चाललेली असे.

गणेशचतुर्थी झाली आणि मग कंपनीच्या खाणी जोरांत सुरू झाल्या. रात्रंदिवस तेंच काम. तीन तीन पाळ्या चालू झाल्या. हजारों माणसं खपूं लागलीं. कंपनींत भरती होण्यासाठीं गांवाकडे परगांवच्या लोकांचा नुसता लोंढा चालू झाला–गांवांत हजारबाराशे तर घरं, वस्ती तीन हजाराच्या आंत. एकदम या चौचोपट उपऱ्यांची व्यवस्था कोण न् काय करणार! कंपनीनं ती केली नाहींच. कारण नव्हतं. माणसं खाणीवर कामाला हजर असलीं कीं झालं! तीं कुठं रहातात? काय खातात! कशी वागतात?–या प्रश्नांशीं कंपनीला कर्तव्य नव्हतं. कर्तव्य होतं गांवाचं. त्यानं तें न चुकतां बजावलं. पडव्या आणि ओटे या पाव्हण्यांसाठीं रिकामे झाले. अडगळीचे मांगर त्यांनाच साफ करायला लावले. गोठ्यांत पण, गुरांना जवळ जवळ बांधून, जागा करून दिली...

कोणावर उपकार करतांना सुद्धां कोंकणी माणूस व्यवहार सोडत नाहीं. पैशाचा वास त्याला खूप दूरून येतो. ह्या बाजूच्या पाण्याचाच गुण तो. छेः छेः! गांवचीं लोकं कंपनीच्या वाटेला गेलीं नाहींत. खाणीवर आठवड्याला नऊ रुपडे मिळत. म्हणजे दिवसाला दीड झाला. साडे आठ ते पांचपर्यंत कमींत कमी आठ तास खडी फोडत बसावं तेव्हां. (मध्यें बाराला तासभर जेवणाची सुट्टी असे) तर तासाला पडला दीड आणा. पुरी चवलीसुद्धां नाहीं. घाट्यांनींच करावींत हीं ढोरकामं. टाळकं नाहीं लागत. बरं फायदा म्हणावा तर कवडीचा पण नाहीं. नुकसानच. तासाला चवलीहून अधिक रक्त आटवायचं. शहाणा माणूस वेडा झाला तरी हा वेडेपणा करणार नाहीं. आणि गांवांत शहाणीं माणसं खूप होतीं. त्यांच्या शहाणपणाला वाव नव्हता, संधीच नव्हती. ती आली मात्र–आणि—

आणि गांवाच्या माणुसकीचा बाजार झाला होता–लिलांव चालला होता. पहिल्या पावसाला अळंबी उठावींत तशीं ठिकठिकाणीं दुकानं उठलीं होतीं–चहाची, पाव-बिस्किटांची, पानतंबाकूची. खाणावळीचा धंदा तेजींत आला. कंत्राटं सुरूं झालीं. मॅंगनीज फोडण्याचं काम कंत्राटानं अंगावर घ्यायचं आणि चार घाटी लोकांकडून कमी खर्चांत तें करून घेऊन मधला फायदा लाटायचा. ओंगळ अन् अन्नाडी म्हणून पाव्हण्यांना घराचा उंबरा कोणी चढूं देत नव्हतं. पण घरच्या आसपास टेकण्यापुरती जागा देण्याची मेहरबानी मात्र करीत आणि त्याबद्दल दरडोई पठाणासारखं भाडं वसूल करीत. या लोकांना फक्त सार्वजनिक ओहोळ आणि डबकीं खुलीं होतीं. विहिरीच्या जवळपास त्यांनीं दिसणं गुन्हा होता. आता एक आणा घागर या दरानं हवं तितकं प्यायचं पाणी विकत मिळत होतं म्हणून बरं–नाहींतर परगांवच्या पाव्हण्यांची पुरती पंचाईत झाली असती.

होय! चार महिन्यांत गांव बरंच बदललं होतं. आणि बरोबर गांवचीं लोकं पण—

विजयला हें कळत होतं, दिसत होतं. आणि अचानक कधींतरी या गोष्टीची त्याला मग तीव्रतेनं जाणीव होई. गुदमरल्यासारखं होई. बुडून गेल्याचा भास होई. आणि वाटे–कांहीं चुंकतंय आपलं, गांवाचं, लोकांचं. प्रवाहाबरोबर वाहत जातोंय सगळे! कुठच्याकुठं!

त्याच्या जिवाची विलक्षण उलाढाल चालू होई. मन खिन्न होई, विषण्ण होई.

अनुक्रमणिका





नकळत मग त्याचे पाय घरामागील समुद्राकडे वळत...

आजदेखील समुद्रकिनाऱ्यावर आला आणि विजयला मुक्त झाल्यासारखं वाटलं. कोंडवाड्यांतून निसटून बाहेर पडल्यासारखं झालं. त्याच्यांतील माणूस ताजा झाला. भूक असणारा, सुख भोगणारा.

भरती होती. डोंगराएव्हढाल्या लाटा उठत आणि आकसून किनाऱ्यावर फुटत होत्या. सुक्या रेवेंत उधाणाचं पाणी विरत न् जिरत वर चढत होतं. पिसोळ्या कुंल्यां कुरकुरत बिळाभोंवतीं वाळूंची रांगोळी घालीत होत्या आणि सावलीची चाहूल लागली तरी भुर्कन् बिळांत दडत होत्या सातासमुद्रांचं गाणं गात वारा भिंगोऱ्या नाचत होता.' सळ्सळ् झावळ्या वाजवून माडांचीं झाडं किनाऱ्यावर ताल देत होतीं.

एव्हांना वर डोंगरांत खाणी सुटल्या होत्या. माणसं परतलीं होतीं. टोळक्यांनीं तीं समुद्रावर उतरत होतीं. बावळीं तोंडं, मुंडी सदाच खालीं. घामानं अन् मातीनं लालीलाल मातलेले कपडे अगावर. अगदीं माफक. गंजीफ्राक अगर तोकडं खमीस, पट्टयांची चड्डी. सरळ चालणं जसं या लोकांना माहीतच नव्हत. फेंगड्या पायांनीं पुढल्या पावलांवर धांवत जातील. आपसांत बोलण्यासारखं पण त्यांच्याकडे बहुधा कांहीं नसावं. गप्पा मारतांना सहसा दिसणार नाहींत. असतील टोळी करून–पण त्यांच्यांत हितगुज नव्हतं, रहस्य नव्हतं, खाजगी गोष्टी नव्हत्या. आज आठवड्याचा पगार झालेला. खरं म्हणजे खुश असायला हवं यांनीं. आणि असतील सुद्धां. पण एकाच्याहि मुद्रेवरून तंसं वाटत नव्हतं. चेहरा तोच, गबाळा–ठोकळ्यासारखा. रस्ता चुकून भलत्याच गांवांत आलं म्हणजे माणूस स्वास्थ्य आणि स्वत्व गमावून बसतो असा. एका पोटासाठीं बाकी सर्वस्व हरवलं होतं त्यांनीं आणि या व्यथेनं त्यांचं शरीर मन तळमळत होतं, कळवळत होतं. जगण्यासाठीं भलतंच मोल देत होते बिचारे! आणि त्यांना हें कळतहि नव्हतं!

साहेबाला बघून त्यांच्या माना आणखीन खालीं जात. विजयचे फक्त पायच दिसत होते त्यांना. दुसरीकडं कुठं बघायलाच ते तयार नव्हते. नाहींतरी तो त्यांचा देव होता. त्यानंच यांची खाणीवर भरती केली होती. कातड्याचे जोडे करून या साहेबाला वाहिले तरी त्याचे उपकार फिटणारे नव्हते अशी त्यांची श्रद्धा होती.

आणि जवळ आले कीं नजर पायावर लावून ते आपले उभे रहात. निमूट, चुपचाप. मोठ्या भक्तिभावानं बघत.

विजयला मग बोलावंच लागे. तो हंसून विचारायचा, 'काय? बरं आहे?'

'जी साहेब.'

'पगार मिळाला?'

'जी होय.'

साहेबाकडे त्यांची तक्रार नव्हती. कसलीच तक्रार नव्हती.

हेंच चाललं होतं. घाटी लोकांचं एकएक टोळकं त्याला भेटत होतं. आणि 'जी होय' करीत पुढं सरकत होतं. काळोख पडेपर्यंत हे इथंच किनाऱ्यावर बसून वेळ घालवणार होते. मनाशीं गांवाकडल्या आठवणी काढीत, उसासत, कासावीस होत. कारण निवांत पडायला त्यांना हक्काचं घर नव्हतं–विजयला हें ठाऊक होतं आणि हें सुद्धां ठाऊक होतं कीं उघड्या समुद्रकिनाऱ्यावर सुद्धां गांवची लोकं त्यांना स्वस्थ बसूं देत नव्हतीं.

किनाऱ्यानं विजय तसाच चालत राहिला.

पुढं जमिनीचं टोकं चिचुंद्रीच्या तोंडासारखं चिंचोळं होऊन समुद्रांत घुसलं होतं. अर्थात पाण्याला ही गोष्ट पसंत नव्हती. जमिनीच्या तुकड्याचा दिमाख त्याला सहन होत नसावा. भरतीच्यावेळीं आसावून, उसावून आपल्या सर्वशक्तीनिशीं रोजच तो या चिमुरड्या चिचुंद्रीवर तुटून पडे. फोडून फाडून तिला उदरांत गडप करण्याचा प्रयत्न करी. कधींतरी तसं होणारच होतं.

नाहीतरी आज सुद्धां भरतीला हें टोक जमिनीपासून लचका तोडल्यासारखं तुटून अलग पडे. चारी बाजूंनीं समुद्राचं पाणी त्याला वेढा देऊन उसळत राही.

आणि कधीं नाहीं ती विजयला हुक्की आली. पॅन्ट ढोपरापर्यंत वर करून तो पुढं झाला. पायानं खालीं जमिनीचा ठाव घेत पाण्यांत शिरला. भरतीचं पाणी चोहींकडून थरकत अन् गरगरत चढत होतं, उसळून उडत होतं. दहा–पंधरा पावलंच–पण तें अंतर पार करून जायला त्याला बराच वेळ लागला. पलिकडच्या कांठाला पोचेपर्यंत त्याचे कपडे पार चिंब झाले होते. पण बघायला होतंच कोण? माडांची चार झाडं–आणि तुटलेल्या कड्यांचे कळकभिन्न खडक—

आपण कांहीतरी भलताच पराक्रम केलाय् अशा धुंदींत विजय होता, त्याच उल्हासित मनःस्थितींत उड्या मारीत तो बाजूला खडकावर चढला आणि समोर—

—समोर!

स्वप्नांत तर नाहींना? क्षणभर त्याला कळेचना! भास वाटला. त्यानं डोळे चोळले. शुद्धीवर असल्याची खात्री करून घेतली आणि तशी झटक्यानं वर गुंडाळून घेतलेली पॅन्ट तो खाली करूं लागला.

'तूं—' आधींच त्याच्या तोंडून प्रश्न गेला होता.

'मी–' वासंतीनं खिदळत उत्तर दिलं. त्याला तिनं केव्हांचा पाहिला होता. त्या तिकडे पाण्यांत तो धडपडत होता तेव्हांच. आणि तेंव्हांपासून त्याला न्याहळत ती तशी उभी होती.

'तूं–तुम्हीं–' काय बोलावं विजयला कळेना. तो अडखळला.

'मी आम्हीं–तूं–तुम्हीं. तो ती तें–तेत्यातीं–' ती मोठ्यानं हंसत सुटली. 'अहो, काय झालंय तुम्हांला?'

'भलतंच–' विजयाचा जाब.

'भलतच म्हणजे...'

'म्हणजे–म्हणजे! पण आधीं सांगा, तुम्ही कुठं इकडे!' तो हळूहळू भानावर येत होता. विजेच्या धक्क्यांतून सावध होत होता.

'आजच नाही पहिल्यानं आलें.'

'अच्छा!' हंसण्याचा एक केविलवाणा प्रयत्न. बाकी मुद्रेवर गोंधळ चालूच.

'लहान होतें ना तेंव्हा कवड्या गोळ्या करीत आलें होतें एकदां या बाजूला. समुद्रांत इतकी आंत, गांवापासून दूर, अगदीं एकीकडे असलेली ही जागा तेव्हां सुद्धा किनई मला खुप आवडली होती.. मनच जडलं म्हणाना–जागेवर.''

'आतां लहान नाहीं राहिलांत तुम्ही.' विजयनं मध्येंच हंसून म्हटलं.

'पण वेड राहिलंय ना! नाही जात. तास झाला, अडकून पडलें आहे. मेलं तें पाणी जरा उतरण्याची वाट बघते आहे. आई घरीं काळजी करीत असेल. पोरीचा काय पत्ता—'

'म्हणजे सांगून आलांत नाहीं होय ?'

'हूं : ! काय सांगायचं यांत ?' वासंतीनंच त्याला उलट छेडलं. 'म्हणजे आपलं बरं ! आई, दाजी, कान्ता-म्हटलंच तर उभा आवाठा लोटला असता एव्हाना इकडे बच्छीचा तपास करीत. आणि इंथं माझ्याबरोबर तुम्हाला बघून-अय्या, दिट्टो सिनेमांतला सीन झाला असता बघा, नाहीं ? आणि काय हो ? समजा असं झालंच, तर काय कराल तुम्ही ?' गूढ आवाजांत तिनं एकदम जड प्रश्न विचारला. सहज, बोलतां बोलतां.

काय विक्षिप्त होती पोरगी. विलक्षण प्रश्न नको तो, नको तेव्हां, नको तिथं. आणि विजयची स्थिति मात्र बिलकुल अवघड करून टाकली. बोलणार काय ? म्हणजे-म्हणजे त्याला ठाऊकच नव्हतं.

निरुत्तर होऊन तिच्याकडे, तो बघत राहिला. पण तोच प्रश्न तिच्या चेहऱ्यावर उठला होता, डोळ्यांत साठला होता. खोल, कुठंतरी आंत उजत अन् रुजत होता...तरल, संमादक धुंदीचे दोन क्षण. भाराव-लेले, मंतरलेले.

आणि मग विजय हंसत सुटला. म्हणाला, 'अहो, असं कधीं घडणारच नाहीं. फक्त सिनेमांतच घडतं हें.'

उंदीर निसटला होता. मांजरीनं अंग टाकलं. बाहेर आलेलीं नखं आंत ओढलीं.

विस्कटलेल्या भरभरीत आवाजात वासंतीनं विचारलं, ' 'मग तुम्ही इथं कां आलांत ?'

'सहज-ॲक्सीडन्ट.'

'ईयू !' ती शहारली, 'ॲक्सीडन्ट म्हणे ! इथं मरत नव्हतें कांहीं मी !'

'तुम्ही इथं असाल अशी मला कल्पनाही नव्हती. विजय म्हणाला.

'मला तर वाटलं-'

'काय ?'

'जाऊं द्या ना ! वेडी आहे मी.'

'काय वाटलं तें तरी सांगा. मग पुढचं ठरवतां येईल.'

'म्हणजे मी वेडी आहे कीं नाही तें ! होय ना ? पण मी मुळीं वेडीच आहे. म्हणून तर मला वाटलं-वाटलं माझ्या इच्छाशक्तीच्या जोरावर तुम्हाला मी माझ्यामागं ओढत इकडे आणलं.'

पाठ केल्यासारखं एका दमांत वासंतीनं सांगून टाकलं. आणि तिचं तिलाच मग मोकळं वाटलं, हलकं वाटलं. तिरप्या डोळ्यानं त्याचा वेध घेत तिनं मान वेळावली. गाल फुगवून कुसूंनसूं ती म्हणाली,

'बोला ना !'

'आं !'

'हेंच !...कीं खरं नाहीं-म्हणजे मला वाटलं तें.'

'कुणास ठाऊक !'

'काय ?' वासंतीचा आवाज आवर्जून घोटाळला.

'कदाचित् खरंही असेल !' खोल बुडालेल्या स्वरांत विजय पुटपुटला.

'म्हणजे ?' तिनं खालचा ओठ चावला. ढळलेला पदर धड-धडत्या छातीवर ओढला. डोळे विस्फारून त्याच्याकडे झेपावत पाहिलं.

'वासंती-' एक साद. नांवाला अर्थ नसलेला, भावाला नांव देणारा, कर्तरी प्रयोग.

'विजय-' नुसता पडसाद. अवकाशांत उठलेला, अस्तित्वाची जाग घेणारा, कर्मणी प्रयोग.

'वसू—'

'—विजा.'

'संती—'

'—जया.'

'काय ग ?' मग प्रश्न.

'कुठं काय ?' प्रश्नांतच उत्तर.

'इश्श ! सोडना !'

'आं !'

आणि वासंतीनं म्हटलं, 'हात सोड माझा—'

'सोडूं ? नाहीं.' विजय म्हणाला.

'असाच धरून ठेवणार आहेस ?'

'होय ! आणि तुलाहि,' विजयनं उसावून म्हटलं.

'तोंड पहा धरून ठेवणाराचं.'

'तेंच बघतोंय तुझ्या डोळ्यांत. आरसा नाहीं ना-म्हणून.'

'जा जा ! चावट आहेस.' वासंती त्याला बिलगली.

'चावट नाहीं-चिवट.' तिच्या पाठीवरील दोन वेण्यांशीं विजय चाळा करूं लागला.

थोडा वेळ असाच गेला. एकमेकांकडे नुसतं बघण्यांत, नसतं हंसण्यांत. मूकं बोलणं, शब्दाविणं, मुक्त रूंजन, भावनांचं.

आणि मध्येंच ती ओरडली, 'अहो मिस्टर, आतां मात्र निघायलाच हवं मला. जरा बघा तिकडे. भरती ओसरलीय.'

म्हणजे विजयचं लक्षच नव्हतं. ते गेलं. त्यानं मागं पाहिलं. खरोखरच मधलं पाणी उतरलं होतं. वाट मोकळी झाली होती.

त्यानं विचारलं, 'जायलाच हवं ? नाही ?'

'हो ना !' आणि पहिल्यानंच वासंतीची मान खालीं गेली.

'चल मग.' तो म्हणाला. तिच्या बरोबर तोहि निघाला. हातांत हात घालून.

पण वासंतीनं त्याला अडवलं. जिवावर आलं होतं तिच्या. आणि तरीहि ती बोलली, 'मी एकटीच जाते पुढें—'

'नो-नो !' विजयची हरकत होती.

'वेडा तर नाहींस ?' तिनं विचारलं-

'नव्हतो. तूंच लावलंस तें.' आणि त्यानं तिचा हात सोडला.

तशी ती हंसली. अवखळ, खळखळत. आणि मग पळतच सुटली वाऱ्यावर, समुद्राची लाट कशी. लहरींत लहरत, तरंगत. खडक उतरून खालीं आल्यावर माडाआडून तिनं मागं बघितलं. त्याच्या रोखानं, त्याच्याचकडे, तें तसं चांदण्याच्या डोळ्यांनीं, चांदणीसारखं...

विजय चांगला काळोख झाल्यावर घरीं परतला होता. त्याच्या मामाचा अद्याप पत्ता नव्हता.

स्वैंपाक घरांत खुशाली कामांत होता. विजयला बघून तो ओर-डला, 'साहेब, ही घाट्यांची जात महा डांबीस ! तुम्ही घरला आलांत. आणि ही गोष्ट परोपरीनं मीं त्यांना समजून सांगितली. हराम ऐकेनात. म्हणूं लागले, लोकांना लायनींत उभे ठेवून साहेब नाहीच जाणार. आणि गेले तरी परत येतील. लई चांगले आहेत. म्हणजे बघा जीव तोडून मी इतकं सांगतो आहे तर मी खोटा ! काय ?'

आणि मग आपण केलेल्या पराक्रमाचं ( म्हणजे भानगडीचं ) खुशालीनं चऱ्हाट लावलं. त्यांत मुद्याचं इतकंच होतं—त्यानं आज विजय नाहीसा बघुन मुकादमी गाजवली होती. रखवालदारांना बोलावून रांगेत उभ्या असलेल्या लोकांना, शेतांत शिरलेल्या ढोरांसारखं मारपीट करून हांकलून लावलं होतं. आणि म्हणून तो जाम खुश होता.

अण्णागुरुजी गोळेसाहेबाकडे गेला होता तो रातला सुद्धां घरीं आला नाही. जोरजोरानं बूट वाजवीत आणि जिकडेतिकडे टॉर्चचा उजेड टाकीत गर्जना करीत रामप्पा शेट्टी आला होता आणि सांगून गेला कीं ' बुड्ढा रातको नही आयेगा. '

कां ? ' विजयनं कारण काढून घेण्याचा प्रयत्न केला.

रामप्पानं तें सांगितलं नाहीं. त्यालाही माहीत नसावं. आवाज चढवून तो गुर्मीत म्हणाला, ' टॉप शिक्रेट. ' आणि अंग घुसळत हंसूं लागला. हंसतच काळोखांत नाहींसा झाला.

दुसऱ्या दिवशीं रविवार. कंपनीला सुट्टी होती. दुपारच्या जेवणासाठीं मामाची वाट बघत विजय ताटकळत बसला होता. तर एकच्या मानानं अण्णागुरुजीचं आगमन झालं. एकटा नव्हता. बरोबर गोळेसाहेब आणि गांवांतलीच चारपांच माणसंसुद्धां होतीं.

अण्णा आला तोच हात वारे करीत आणि डरकाळ्या फोडत, ' बेटा पहिली फेरी तर जिंकलोंच. दाजी नाबरानं राजिनामा दिला ?'

' कसला ?' विजयला कांहींच कळेना.

' ग्राम विकास मंडळाच्या अध्यक्षपदाचा. आणखीं कसला राजिनामा देणार ?'

गांवातल्यापैकीं एकानं खुलासा केला.

'तुझा मामा झाला पुढारी—म्हणजे काय ? होणारच.' अण्णागुरुजीनं म्हटलं. ' निवडणुका घेताहेत भांचोद ! क्या म्हणावं ? प्रत्येकाला आडवा घालीन काय ? बामणांचे दिवस आतां गेलेत. आमची मेजॉरिटी आहे. तेव्हां सत्ता आमची—काय हो ?'

बाकीच्यांनीं त्याला एकमतानं पाठिंबा दिला. ' अण्णा, त्याची काळजीच नको! तुम्हीच निवडून येणार–ग्राम विकास मंडळाचे अध्यक्ष आतां तुम्हीच–'

' आणि खाण समितींत गांवचा प्रतिनिधी पण.' गोळेसाहेबानं पुढं पुस्ती जोडली.

' दाजी नाबराला म्हणावं शहाणा असशील तर आतां गप्प बैस. अण्णागुरुजी हरभऱ्याच्या झाडावर चढून ओरडला. तो नशेंत होता. दारूच्यापेक्षांही भयंकर होती ही नशा. म्हणूनच त्याचा साफ तोल सुटला होता. विचार बिलकुल राहिला नव्हता. विवेक उरलाच नव्हता.

आणि ' तुझंच बरोबर ' म्हणायला गांवांत भगतगणही त्यानं गोळा केला होता.

कपाळ !

अण्णागुरुजी बदलला होता !

गांव बदललं होतं !

●●●

# रसिक वाचकांसाठीं एक आकर्षक योजना

' **दीपावली** ' मासिकाच्या वार्षिक अंकांतील कथा, ललित लेख, कविता, रंगीत कलाकृति,, व्यंगचित्रें तुमच्या वाचण्यांत व पहाण्यांत आली असतीलच. ती सर्व तुम्हाला आवडली असतील. यामागें एक योजना आहे.

' **दीपावली** 'च्या वाचकवर्गाची आवडनिवड अजमावून त्या प्रकाशांत पुढील वाटचाल आंखणें हा या योजनेमागील एक उद्देश आहे. एकूण साहित्याच्या, वाङ्मयाच्या व सजावटीच्या दृष्टीनें, सामान्य वाचकांच्या आवडीनिवडीचें मोजमापही यांत मिळालें तर फायदा होणार आहे. वाचक उत्साहानें सहकार्य देतील अशी आशा आहे.

## कूपन

१ उत्कृष्ट कथा....................................

२ उत्कृष्ट ललित लेख..............................

३ उत्कृष्ट कविता...................................

४ उत्कृष्ट रंगीत कलाकृति...........................

५ उत्कृष्ट व्यंगचित्र..................................

पूर्ण नांव व पत्ता....................................

..........................................................

योजनेच्या अटी मला मान्य आहेत.

सही.......................................

● याच पानावर विनामूल्य कूपन दिलें आहे.

● सोबतच्या कूपनवर दीपावलीच्या वार्षिक अंकांतील तुम्हांला आवडलेली उत्कृष्ट कथा, ललित लेख, कविता, रंगीत कलाकृति व व्यंगचित्र लिहावें.

● कूपन भरून पाठविण्याची शेवटची तारीख १५ डिसेंबर १९६३ आहे. यानंतर येणाऱ्या कूपन्सचा विचार करण्यांत येणार नाहीं. संपादकाचा निर्णय अखेरचा.

● येणाऱ्या एकंदर कूपन्समधून बहुसंख्येनें निवड झालेल्या कूपनांतून जे निर्णायक कूपन ठरेल त्या कूपनाला जुळणारी कूपनें असलेल्या वाचकांना १ वर्ष ' दीपावली ' मासिक भेट म्हणून पाठविण्यांत येईल.

● एका वाचकानें फक्त एकच कूपन भरून संपादक, ' दीपावली ', दलाल आर्ट स्टुडिओ, ४२ केनेडी ब्रीज, मुंबई–४ या पत्त्यावर पाठवावे.

● निर्णय जानेवारी १९६४ च्या अंकांत प्रसिद्ध करण्यांत येईल.



# गीतार-हास्य

**वा-मित्रा** (आणि मा मैत्रिणी) नमस्कार. म्हणक्षे आपल्या गीर्वाणींत प्रथमं वंदे कां काय म्हणतात ना त्यातलंच. छे छे भलत्याच ठिकाणीं पूर्णविराम दिला बघा. पुढचा शब्दच गळून गेला. नाहीं घाला तिथं नि वाचा. नाहीं शब्द मला गाळायचा नाही. नाही तर झटकन तुम्हीं मला महाराष्ट्र सरकार अशी नांवरस पेश कराल ! तुम्हीहि डोक्याला हात लावून म्हणाल कीं हा आहे-नाहींचा वाद मोठा खमंग खरा. पुण्यांत पानशेतचं एवढं उदंड पाणी झालं. प्रतिभावंतांच्या लेखण्या त्यांत पार गारठल्या. स्फूर्तीला कुडकुडीच भरली. तरी अजूनहि आशा आहे. व्हेऑंतवर एखाद्या साहेबाची कलाकृती बाहेर पडल्यावर मराठी प्रतिभावंतांना फेपरे भरल्याशिवाय रहाणार नाहीं. पण तोंवर काय ? महाराष्ट्र सरकारनें त्यावर स्वःतच नाट्य निर्माण केले. पुण्यपत्तनस्थांच्या आसवांची फस वाफ झाली. यंदाचं साहित्याचं प्रथम बक्षिस कुणाला द्यायचं याचा विचार आतां समितीला पडूं नये. सगळं उजवा हात ते डावा हात. हं.

या उजव्या डाव्याची झक्क झुंज लावुन दिलेय कम्युनिस्टांनी. बुद्धीभेद व गोंधळ हें मोठं तंत्र. रक्त, शस्त्र असल्या प्रकारांनी या आर्यावर्तांत कांहीं जमत नाही हे बेटयांनीं ओळखलं नि कॉंग्रेसचं आतडंच मोजायला सुरुवात केली. त्यांत सहप्रवासी कृष्णकारस्थानांची पंढरी पिकलीय पहा. पण वाईटातहि बरं होतं हें पटलं बुवा. माझी आजी सांगायची, अरे होतं ते चांगल्याकरतांच होतं. सगळंच कांहीं खरं नाहीं तरी थोडं खरं आहे. स्वातंत्र्याचं हे सोळावं. लोकशाही समाजवादाचं मिसरूड फुटायला लागलंय हेंहि नसे थोडकें. पण कॉंग्रेसचा पत्ताच मुळीं दिल्लीच्या जंतरमंतर रोडचा आहे. माहित नसेल तर तपास करा. सारा उलगडा होईल.

आपले बाळोबा एकदां जंतरमंतर रोडनेंच धांवत आले नि माझी कॉलर खेचून धांपावत म्हणाले, 'अरे नेहरूच पहिले छुपे कम्युनिस्ट आहेत. मॅकमहॅान रेषेपर्यंत सैन्य नेणार नाहीं असं चाऊला त्यांनीं गुपचूप सांगून टाकलंय...'

'बाळोबा...' मी त्यांच्या खांद्यावर हात ठेवून स्वतःचं दाताड उघडण्याचा यत्न केला. पण ते कसचे.

'तुम्हीं काय बोलणार तें मला माहित आहे मी भारतीय आहे. त्यामुळें अंतर्ज्ञानी आहे. उगीच नाहीं, चाऊ नेहरूंच्या निमंत्रणाची वाट बघतोय.

'बाळोबा' मी जरा लेंकसलोंच. 'तुम्हांला आधीं भारतसंरक्षण कायद्याखालीं अटक करायला हवी. भारत सरकारनं इन्कार केलाय...'

ऐकायला बाळोबा थांबलेच नाहींत. तडक पलायन केलं त्यांनीं. अटकेला बाळोबा फार घाबरतात. देशभक्तांची ती पदवी आहे इतपतच त्यांना तें पटतं.

पण या अटकेनं आज संधीसाधूसुद्धां हुतात्मे बनत आहेत. वास्तविक दुसऱ्याच्या आईबापाचीच उठाठेव करण्यांत याचं तथाकथित भडक राजकारण गुंगलेलं असतं.

तरी हें बाप प्रकरणं मोठं इरसाल खरं. मध्यंतरी कुणी तरी बोंबललं, 'शृंगाराला कुणाच्या बापाची भीती आहे ?' आणि नाहक आरोपी होण्याची पाळी आली. पण सगळ्यांत गंमत अशी कीं; तत्वाचें बुरूज रचून या आरोपींना पाठीशी घालण्याची चुरस झाली. पानाला चुंबन; दर पांच रुपये, दोन पानाला मिठी, दर दहा रुपये; संपूर्ण नाड्या तटतटवणारी कथा, दर सत्तर रुपये असे भाव घेऊन शृंगाराच्या नांवाखालीं बीभत्सपणाचा बाजार मांडणाऱ्यांनीं 'काका मला वांचवा' अशी धांवाधांव करण्यांत हंशील काय ! डी. एच. लॉरेन्स व मर्ढेकर यांच्या स्वतःच्या लेखणीवरील श्रद्धेच्या आसपास तरी हें फिरकूं शकतात कां ! सगळी धडपड कातडी बचावण्यासाठीं. सटवीच्या करणीनं पाठीराख्या बुद्रुकांना बरी शेंडी लावली. केवळ स्वातंत्र्याचे मुक्तसुनीत विंदांच्या तोंडीं शोभेल. पण सगळेच विंदा नाहींत. यास्तव तर समाज कायद्याचं बोट धरतो.

कायदा गाढव आहे असं म्हणण्याची एक फॅशन आहे, पण असं म्हणणारे स्वतःचा गाढवपणा त्या कायद्यावर लादत असतात. बिचारा कायदा या गाढवांच्या संगतीत येतो व विनाकारण गाढव ठरतो. कायद्याची उभारणी तर विवेकावर झालेली असते. म्हणून तर केवळ कायद्याचा फायदा उठवितां येत नाहीं. फातिमा नांवाच्या महिलेचा पोटगीचा दावा प्रेसिडेन्सी मॅजिस्ट्रेटनी फेटाळल्याबद्दल विशाल महिला मंडळांनी त्यांचा सत्कारच करायला हवा. निस्पृहपणाचा डांगोरा पिटण्यासाठीं महिलामंडळांना ही सोनसंधी आहे. त्या फातिमाच्या नवऱ्याचं नांव युसुफ. मुस्लिम पर्सनल कायद्याप्रमाणें त्यांची चार लग्नें. पण फातिमाचा मात्र हा नववा नवरा होता. बा मित्रा ! आतां तुम्हींच सांगा, तिला या विविध नवऱ्यांची चटकच लागलेली नसेल

*या अंकापासूनच हें एक नवीन सदर सुरू करीत आहोंत. अंक अधिकाधिक आकर्षक करण्यांतील हा एक प्रयत्न. प्रत्येक महिन्यांत अनेक रंजक व गंभीर घडामोडी घडत असतातच. त्यापैकीं सामाजिक, राजकीय, आर्थिक, सांस्कृतिक, साहित्यिक इत्यादि घडणाऱ्या कांहीं महत्वपूर्ण घडामोडींचे विनोदी व रंजक पण तेवढेंच मार्मिक समालोचन आमचे '* **श्रीयुत अजबराव** *' हंसत-खेळत करणार आहेत. रसिक वाचकांना तें खूप आवडेल अशी अपेक्षा आहे.*

---

कशावरून! कळलं काय! शृंगारवाङ्मय-वाल्यांची चटक अशीच.

कुणाला ही चटक तर कुणाला ती चटक. चिन्याची चटक तर सर्वांत महाभयंकर. युद्धाची चटक. युद्ध म्हणजे साधेसुधे नव्हे, अणुयुद्ध. केवढा आशावाद! अणुयुद्धांत भांडवलशाही मरणार आणि फक्त साम्यवाद पृथ्वीवर जगणार. कामगारांचे नंदनवन. भांग पिणाराहि मला वाटतं एवढं डोकं हरवून बसत नाहीं. चिनी हा प्रथम चिनी. नंतर सर्व कांहीं. युद्ध झालं तर त्यांच्याकडे आहेच काय नाश होण्यासारखं? विचारांचंसुद्धां दारिद्र्यच. नेकी तर शोधून मिळायची नाहीं. आत्तां होय म्हटलं, पाठ फिरली कीं नाहीं म्हटलं. रशियासारख्या बंधूराष्ट्राशीं जर ते असं वागतात तर भारतासारख्या मित्रराष्ट्राशीं ते असं वागले नाहीत तरच नवल. इतिहासाच्या धड्यानं जागं व्हायला दिल्लीनं देशाला सांगितलं. पण इतिहासाचा धडा दिल्ली स्वतःच विसरली. कम्युनिस्ट राष्ट्राशीं हद्द असलेल्या लोकशाही राष्ट्रानं नेहमीं शस्त्रसज्ज रहायला हवं असं जागतीक इतिहास टाहो फोडून सांगतो. पण भारतानं शस्त्र कारखान्यांत बनवली कॉफीची यंत्रं आणि चाऊंचं स्वागत करून त्यांतली कॉफी पाजली. सामान्याला जो व्यवहार कळतो तो केव्हां केव्हां उच्च पदस्थांनांहि कळूं शकत नाहीं. दुसरं काय! या स्वप्नरंजनाची कबुली पंतप्रधानांनीं दिली हीच भाग्याची गोष्ट. आतां तरी सारे यशवंत होवो. भारताकडे वांकड्या नजरेनं पहाण्या आधीं परक्यानें, शंभरदां राहूं द्या पण एकदां तरी विचार करण्यासारखी शस्त्रस्थिती इथं निर्माण झाली तरी पुरे. आम्हां भारतीयांना जगाच्या उठाठेवी फार. स्वतःच्या घराकडे लक्ष कमीच. चिन्यांची युद्धाची चटक गाडायला हाहि उपाय आहे. या चिन्यांच्या बाबतींत यूनोचे थांट म्हणाले, ' अणु युद्धांत जय.फक्त मृत्यूचा होईल. ' चिन्यांना हें समजत नसेल तर समजवण्याची जबाबदारी भारतीयांवरतीच अधिक आहे. कारण आपल्याशीच त्यांची सारखी गांठ आहे.

अशी गांठ पडते व बाळोबांच्या बोलण्याकडे माझं चित्त केंद्रित होतं. त्यांनी डोकं हांसडून मला विचारलं, ' कायरे? चीनमध्यें कामराज प्लॅन नाहीं? '

बाळोबा फार घाईनं बोलतात. मी उत्तर देण्याच्या आंतच त्यांनीं विचारलं, ' ये क्या तमाशा लगाया है!'

' म्हणजे!' मी बावरलोंच.

' अरे त्या मोरारजींना उगाच बेकार करून टाकलंय. बांधलेलें होते तें ठिक होतं. दिल्लीहून सुटल्याबरोबर दिली गचांडी जीवराजना. बिचारे सातासमुद्रापलीकडे टोपीकरांच्या विलायतेंत जाऊन पडले. त्यांना मी एक विलायती गुलाब पाठवायला सांगणार आंयू.

' बाळोबा '

' थांब. माझं ऐकून घे. मधे मधें बोलतो. आमची फॅमिली जॉइंट आहे जॉइंट. सालं वाण्याकडे जा, शिंप्याकडे जा, डॉक्टरकडे जा हीच धमाल. मला माझ्याकडेच यायला वेळ नाहींरे. फार कंटाळलोय. आमच्या फॅमिलीला मी कामराज प्लॅन लावणाराय्.

' तर मग नवे कुटुंबपंत कोण!'

' अरे पण नविनच प्रश्न उभा झालाय. पुतण्या वयांत आलाय. तो सारखा विचारतो... आम्हांला कामराज प्लॅन कधीं लावणार!'

बा मित्रा, हंसून माझ्या पोटांत पोट राहिलं नाहीं.

असं होतं खरं. दिल्लीला म्हणे एक पार्टी होती. पार्टीला काश्मीरचे पंतप्रधान शमसुद्दीन, बक्षी गुलाम महमंद, गुलझारीलाल नंदा होते. पुढ्यांत चहा होता. बक्षीजी म्हणाले, 'चहा घेऊं या. ' नदांनीं लक्षच दिलें नाहीं. बक्षीजी पुन्हां म्हणाले, ' चहा फार चांगला दिसतोय. कप उचलूं या. ' तरी नंदा थंडच. पुन्हां बक्षीजी म्हणाले, ' चहाचा वास चांगला येतोय. चाखूं या.' नंदांचा थंडपणा अधिकच वाढला. तेव्हां बक्षीजी जरा थांबले. विचार करून म्हणाले, ' आपण चहाचें उद्‌घाटन करूं या.' आणि त्या शब्दासरशी नंदांनी चहाचा कप ओठांना लावला.

आलं ना ध्यानं? अर्थहि कळला ना? हीच तर मेख आहे मेख. अशी संवय लागूं नये म्हणून तर महाराष्ट्र सरकारनें खुर्ची सोडून वाटेल त्या वेळीं कॅंटीनमध्यें जाऊन चहा ढोसण्याच्या कर्मचाऱ्यांच्या संवयीवर बंधन घातलें आहे. फरक एवढाच कीं गुजराथच्या मुख्यमंत्र्यांनीं उपमंत्र्यांवर न बोलण्याचें बंधन घातलें आहे. दोन्हीहि गोष्टी दोघांच्याहि तत्वेतील हितावह नाहींत असें कसें म्हणावें?

पण १८९५ मध्यें दुष्काळी कामांत अहमदनगर जिल्ह्यांत फोडलेल्या खडीचा डोंगर आज पावेतों शाबूत ठेवण्यांत काय हित आहे तें एकले ठेवणारे जाणोत. लोकहिताचीं कामें झालीं त्यांना दुसऱ्या ठिकाणाहूनच खडी आणण्यांत आली. म्हणे दहा लाखांची तरी खडी आहे ही. नोकरशाहीला काय पगार मिळाला म्हणजे झालं, खडीचा डोंगर आणखी कां सत्तर वर्षे राहिना. आणि राष्ट्रीय नियोजन यशस्वी होण्यासाठीं जनता मात्र खडी फोडतेय.

पेपर घेऊन बाळोबा आले नि त्यांनीं विचारलं, ' काय रे! त्या पार्लमेंटमधल्या तीन आण्यांचा याच्यांशीं संबंध आहे काय!'

' बाळोबा.'

' मध्यें तोंड घातलंस. पोरासारखं मधें मधें काय बोलायचं? वर्षाकाठीं दोनशें कोटी... किती! दोनशें कोटी इन्कमटॅक्स बुडतो त्याचा या खडीशीं संबंध आहे काय?'

' बाळोऽ...'

माझं बोलून पुरं झालेलं नाहीं. तीन हजार... किती! तीन हजार कोटींचं जें काळं चलन भारतांत आहे त्याचा या खडीशीं संबंध आहे काय! भारतवीर बोट जळूं दिली त्याचा याच्याशीं संबंध आहे काय? सिनेकलावंतांच्या हेरगिरीचा याच्याशीं संबंध आहे काय? उमापती खेडें चुकीनें पाकिस्तानांत दाखवलें त्याचा याच्याशीं संबंध आहे काय! मुंबईच्या राहणीमानाचा निकृष्ट दर्जा मुंबई विद्यापीठाच्या पहाणींत आढळला त्याचा याच्याशीं संबंध आहे काय? अहमदाबादेला एकता दिनांत कॉंग्रेस कार्यकर्ते अभावाने तळपले त्यांचा ह्याच्याशीं संबंध आहे काय! राजस्थानमध्यें दुष्काळ असतांना जयपूरमध्यें कॉंग्रेस अधिवेशनाखालीं मेजवान्या झडल्या त्याचा याच्याशीं संबंध आहे काय! अन्नांत-औषधांत भेसळ चालते त्याचा याच्याशीं संबंध आहे काय?...'

बाळोबांनी जरासा दम घेतला. तेवढ्यांच



अनुक्रमणिका







संधी साधून मी विचारलं, 'पत्रावळींतले उष्टे अन्न परलापर्यंत टिकेल काय ?'

'अरे उष्टे तर उष्टें. तें तरी मानानं द्या. आम्ही कांहीं पेडर रोडच्या हवेल्या मागत नाहीं. पण चुकतंय, कुठंतरी चुकतंय.'

चुकतंय खरंच. पण सगळे संदिग्ध बोलतात. मला माहीत आहेत बाळोबाचे कष्ट, बाळोबांची-आजची किमान जगण्याची धडपड. इतकं बोललें तरी पुन्हां म्हणाले, 'कांहींहि होवो आपण स्कूटरवजा मोपेड घेणार.'

मी मंद हंसलों. त्यांना तें खटकलं. तेव्हां मी म्हणालों, 'बाळोबा, पांच नग तयार करायचा आदेश असला तरी तीनच नग तयार करून त्यांच्या काळाबाजाराची किंमत सहा नगांची होत असेल तर कोण गुलामाचा पांच नग तयार करणार ?'

'बरोबर बरोबर. याला चारित्र्य लागतं.'

बाळोबांच्या शब्दांनी मला काकासाहेब गाडगिळांची आठवण झाली. महाराष्ट्रांतल्या कांहीं अवखळ म्हाताऱ्यांपैकीं ते असले तरी त्यांच्या बोलण्याकडे महाराष्ट्राचें लक्ष जातें एवढें खास. थोरल्या माधवराव पेशव्यांच्या स्मृतीदिनानिमित्त त्यांनीं चलन कीं चारित्र्य असा प्रश्न उपस्थित करून नव्या दृष्टीकोनाला चालना दिली आहे याबद्दल काकासाहेबांचं अभिनंदन करावंस वाटतं चारित्र्यसंपन्न चलनाची या आर्या वर्तांत वाट बघणे अगदींच युटोपियन ठरूं नये. आणि चलनात्मक चारित्र्य तरी ! पण भारतियांच्या हातांत चारित्र्याचा ध्वज हवा हें निःसंशय.

पाकिस्तान्यांच्या गोळ्यांच्या भडिमारांत पूंचचे विस्कळित जीवन ताळ्यावर आणणाऱ्या भारतियांचा तिरंगा आतां दक्षिण ध्रुवावर फडकत आहे. १९४७ पूर्वींचं तें गीत... विजयी विश्व तिरंगा प्यारा. हेंच तारतम्य ठेवलं तर तो कारखान्यांत फडकेल, शेतींत फडकेल शिक्षणांत फडकेल, शास्त्रीय शोधांत फडकेल. एकट्या नेहरूंनीं रात्रीं दीडदोन वाजेपर्यंत या पंचाहत्तराव्या वर्षीं सुद्धां कष्ट उपसायाचे आणि बाकीच्या जबाबदारांनीं रसगुल्ले खाऊन घोरायचं अशी स्थिती आहे तोंवर जरा कठीणच वाटतं केरळमधल्या थुंबाहून उडणारं रॉकेट स्वर्गसमृद्धी भारतांत आणो. पण मन कसं कुरतडलं जातं. अंतरिक्षाच्या पैजा मारायच्या ऐवजीं आजहि अष्टग्रही करून अडीच शेर खारका मिळवण्यासाठीं दहा तोळे मीठ खाण्याची पैज मारली जाते आणि भारताची मनुष्यशक्ति गमावली जाते. मरणारा आपल्या मरणानंच मरतो पण जगणारानं तरी स्वतःच्या जगण्यानं जगावं.

बाळोबांचं कांहीं अव्वलच. त्यांनीं विचारलं, 'काय रे हें काय द्विभाषिकासारखं ! बालकदिन व कुटुंबनियोजन एकाच दिवशीं ! पोरं हवीतहि म्हणायचं तेव्हांच पोरं नकोतहि म्हणायचं ! हें सगळं अमेरिकन दिसतंय.'

'नाहीं नाहीं. भारतीय आहे.' मी सांगितलं, 'भाराभर असण्यापेक्षां दोन-तीनच असलीं तर त्यांची देखभाल चांगली होणार नाहीं ? म्हणून दोन्ही एकदम. तुम्हांला काय कुत्रीसारखी विणावळ हवी ? पोरांनीं भूक भूक करायचं म्हणजे भारतानंच जगातले उकीरडे फुंकण्यासारखं आहे. बाळोबा.'

'काय ?'

'तुम्हीं शांतचित्तानं ऐकून घेताय ?'

'अगदीं मुडद्याच्या शांतचित्तानं ऐकून घेतोय. आमची बेसुमार वाढीची जॉइंट फॅमिली आहे. ऐकायलाच हवं. फाटकांच्यासारखं सांग. नाहींतर भारद्यांच्या सारखं सांग. पण सांग.'

'बाळोबा, माझं पोरवय. मी तुम्हांला काय सांगणार ?'

'मग मगाचपासून शेण कां खाल्लेस ?'

'अहो शुद्धीसाठीं म्हणा. त्याचं असं आहे बाळोबा, आज प्रत्येकाला देशाचाच नव्हे तर सर्व जगाचा जबाबदार नागरिक व्हावं लागतं. तेव्हां दोन किंवा तीनच जबाबदार नागरिक वाढवण्याची देशाची कुवत असेल तर आठदहा जणांना अधिक जन्मास घालायचं कशाला ! धड तुम्हांलाहि धोतर नाहीं कीं त्यालाहि लंगोटी नाही.'

'पण कायरे श्रीकृष्ण आठवां जन्माला आला तो रे !'

'बाळोबा, तेव्हांपासून दुसरा श्रीकृष्ण आला काय जन्माला ?'

'तें खरं.'

'त्या दुसऱ्या श्रीकृष्णाच्या शोधांत भारताची लोकसंख्या मात्र पंचेचाळीस कोटींवर गेलेय.

'अ ब्बा ब्बा ब्बा.'

बा मित्रा, आतां तुम्हांवरच सोंपवतो. तुम्हीच विचार करा. डॅडी तुटो...छे छे तो जमाना गेला. केस विसकटोत किंवा बूट फाटोत पण तुम्हांला विचार केलाच पाहिजे. मॉस्क्विटो व मलेरिया येत आहे अशा तारा ठोकून तुमचं भागणार नाहीं. तुम्हांला विचार केला पाहिजे. अंतर्मुख झालं पाहिजे. कारण तुम्हांला सगळ्याच गोष्टींचा विचार पडलेला आहे. सिगारेट ओढून कॅन्सर झाला म्हणून त्या सिगरेट कंपनीवर न्यूयॉर्कवासीयानें घातलेली फिर्याद, १३० दिवस नेहरुंना नको असणारे एका खोलीचे गाळे, नेहरुंना दिसणारी शहरांतली इमारतींची जंगलें, राज्य भाषा म्हणून मराठीचा वापर, ड्रायव्हर नसलेल्या बेस्ट बसचा मेट्रो सिनेमावर हल्ला... बघा, पुढें मी आपला लिहीतच गेलों असतों. तात्पर्य असं कीं या सगळ्यांचा तुम्हांला विचार करायलाच हवा. कारण जिथें तिथें तरी तुमचे एकदोन पैसे गुंतलेले असतात. कुठें हातपाय गुंतलेले असतात तर कुठें मन गुंतलेलं असतं.

नेहरूंचा वाढदिवस साजरा झाला. नेहरू तसे चिरतरुण. या चिरतारुण्याच्या बाबतींत अशोककुमारचीहि आठवण होते. दोघेहि आपआपल्या क्षेत्रांत नॉट आउट आहेत. मुलांच्या मेळाव्यांत मुलांनीं 'आजके बच्चे, कल के नेते' अशी घोषणा दिली. मिस्किल नेहरूंचे कान बरोबर जागे झाले. ते म्हणाले 'तुम्हीं सगळेच नेते झालांत तर तुमच्यामागून येणार कोण ?' म्हणजे बघा. नेहरूनासुद्धां नेतेपणाची किती काळजी ! चालायचंच. माळी फुलाबद्दल आणि पाथरवट दगडाबद्दलच बोलणार.

भला मोठा मराठी ग्रंथू मी वाचीत होतों. बाळोबांची पनवती आली तेवढ्यांत.

त्यांनीं विचारलं, 'कायरे, तेरेश्कोवा नि निकोलॅव भारतांत मधुचंद्रासाठीं कां ?'

'त्यांना जाऊन विचारा-' वर न बघतांच मी म्हटलें.

'तेरेश्कोवाला बालगंधर्व साडी पाठवायचा विचार आहे माझा.'

'आधीं सौभाग्यवतीला घ्या'

'अँ ? अरे भारतांत नेहरू, महाराष्ट्रांत यशवंतराव आणि चाळींत फक्त मी. असं माझं वजन असतांना तूंऽऽ'

'यू गेट आऊट. गो टू देल्ही' ग्रंथूत लक्ष लागेना म्हणून चिडून मी म्हणालों. म्हणजे त्यांचं माझं चालत होतं म्हणूनच. बाळोबा गेले.

नंतर चौकशी केली तर खरोखरच बाळोबा दिल्लीला गेल्याचं कळलं. ऑन गव्हर्नमेंट सर्वीस.

●●●

अनुक्रमणिका



# चोरकथा व मोरकथा

*श्री. ह. वि. उसेकर यांनी प्रत्यक्ष न्यायालयांत गुन्हेगारांच्या मनाचा अभ्यास करून व अनुभव घेऊन तेवढ्यांच जीवंतपणे रेखाटलेल्या या कथा—*

**स्त्रियांना** आत्मा नसतो हें मत पूर्वीं ज्याप्रमाणें प्रसृत होतें त्याचप्रमाणें गुन्हेगारांना मन नसतें, भावना नसतात असें मतहि मूळ धरून राहिलेलें होतें. गुन्हेगार म्हणजे गडकऱ्यांच्या कमलाकराप्रमाणें हेतुशून्य अकारण खलनायक, समाजघातकी पुरुष! गुन्हा करणाऱ्या व्यक्तींना मनच नाहीं असें मानल्यामुळें त्याचें मानसशास्त्र त्यांच्या मनोव्यापारांची चर्चा करणारी विचारपद्धति अंमलात येणें हेंही कठीण होऊन बसलें होतें. पण अलीकडील काळांत गुन्हेगारांकडे पहाण्याच्या समाजाच्या या अनुदार दृष्टिकोनांत फरक पडला आहे. गुन्हेगार हा अपराधी असला तरी प्रथम तो मनुष्य आहे, त्याला इतराप्रमाणेंच मन, भावना आहेत व त्याच्या मनोव्यापारांचे सहानुभूतिपूर्वक पृथःकरण केल्यास तो गुन्हा करण्यास कां प्रवृत्त झाला या गोष्टीचा उलगडाही होणें शक्य आहे; वगैरे विचारसरणी हळुहळूं मान्य होऊं लागली आहे. या बाबतींत फ्रेंच लेखक व्हिक्टर ह्यूगो ह्यानें आपली ' ले मिझराबल ' ही कादंबरी लिहून उपयुक्त कामगिरी केली.

इंग्लंडांत जॉन गाल्सवर्दीच्या एका नाटकानें 'एकांत कारावास' या अमानुष शिक्षा प्रकाराविरुद्ध इंग्लडांत झोड उठविली व पार्लमेंटला शेवटीं तो शिक्षाप्रकार बंद करणें भाग पडलें. मराठींतही राजकवि यशवंतांनीं 'बंदीशाळा' काव्य लिहून बाल गुन्हेगारांचें चित्र सहानुभूतिपूर्वक समाजापुढें ठेवण्याचा प्रयत्न केला आहे.

## गुन्हा कशांतून निर्माण होतो ?

आतां कनक आणि कान्ता हे दोन मुख्य हेतु माणसाच्या कार्यप्रवृत्तीमागे सांपडतात. तसेंच सर्वसाधारणपणें, गुन्हेगारांनाही समाजविघातक कृत्यें करण्यास हेंच दोन हेतु कारणीभूत असतात. काम, क्रोधादि सहा शत्रूहि गुन्ह्याच्या मुळांशीं असूं शकतात.

गुन्हेगार हा माणसाच्या दुर्बलतेंतून निर्माण होतो हेंच खरें. हें दौर्बल्य नाहींसें करणें, बरेचसें कमी करणें शक्य आहे. गुन्हा हें दौर्बल्य असल्यानेंच तें इटकून निरनिराळ्या कारणांनीं उघडकीस येतें व गुन्हेगार सांपडतोच सांपडतो. पैसा मिळविण्यासाठीं दुसऱ्याच्या धनाचा लोभ धरणें हा एक प्रमुख हेतु गुन्हा करणारांच्या बाबतींत असतो हें सांगितलें आहेच. आतां पैसा मिळविण्याप्रमाणेंच वाचविण्याच्या प्रवृत्तीनेंही गुन्हे होतात.

'मनी सेव्हड इज मनी गेनड्' पैसा वाचविणें म्हणजे पैसा मिळविणें या तत्त्वानें (१) भारलेले सुशिक्षित लोकही बारीक सारीक गुन्हे करतात! किंवा प्राप्तीवरील कर चुकविण्यासारखा मोठा गुन्हाही करतात! रेल्वेंत किंवा ट्राममध्यें तीन वर्षांवरील मुलांस अर्धें तिकीट पडतें हा झाला नियम किंवा कायदा. पण मुलांचें वय चोरून तिकीट न काढणें किंवा बारा वर्षांवरील मुलांनें अगर मुलीनें अर्धेंच तिकीट काढणें या गोष्टी सर्रास चालत नाहींत असें कोण म्हणूं शकेल? इतकेंच नव्हे तर या गोष्टी यशस्वी रीतीनें केल्याबद्दल अशा लोकांना अभिमान वाटतो ' आम्ही आमच्या नलीचें, ती पांच वर्षांची होईपर्यंत तिकिटच काढलं नाहीं. तिची चणच लहान आहे नां. ' अशी स्वतःच्या चातुर्याची तारीफ शान्ताबाई शेजारच्या कान्ताबाईजवळ करतांना ऐकूं येते. तर, हें कांहींच नाहीं. ' आमच्या माधवचें तर तो सोळा वर्षांचा होईपर्यंत आम्ही अर्धेंच तिकीट काढीत असूं ' अशी फुशारकी कान्ताबाई उलट सांगतात. आतां कंपनीला असें फसविणें हा गुन्हा आहे हे त्या विदुषींना पक्कें माहीत असतें. पण या संबधी एखादा खमक्या चेकर दुप्पट पैसे वसूल करीपर्यंत आणि खटला भरण्याची धमकी घालीपर्यंत सुटत नाहींत.

## व्यापारी जगतात

पैसा बचाऊन तो 'मिळविण्याच्या' या मध्यमवर्गीय मार्गाप्रमाणें थोड्या पैशांत लवकर श्रीमंत होण्याचा मार्ग व्यापारी वर्गांतील बरेचजण अवलंबित असतात. यालाच 'काळाबाजार' किंवा 'बी. एम्.' म्हणतात. काळाबाजार म्हणजे काळोखांतला बाजार, पापाचा बाजार. सर्व व्यवहार गुपचूप, कुणी न पाहील व कुणाला न समजेल अशा रीतीनें करणें. त्या बाजारांतील कमाईला काळा पैसा किंवा ब्लॅक मनी म्हणतात. माल कमी व मागणी जास्त असा प्रकार झाल्यानें काळाबाजार निर्माण होतो. कारण अपुऱ्या सांठ्यामुळें सरकारला मालाचें वांटप करावें लागतें किंवा त्याच्या किंमतीवर निर्बंध घालावी लागतात व असें झालें म्हणजे सांठेबाजी व नफेखोरी यांस उत येतो. हाच काळाबाजार!

साखरेवरील नियंत्रण उठल्यानंतर खुल्या बाजारांत खूप साखर मिळूं लागली. तेव्हां एका साकळचंद शेटजींनीं एकदम शंभर पोतीं साखर विकत घेऊन टाकली. शेटजी तसे धूर्त, व्यवहार कुशल. त्यांनीं

ती पोती लपवून ठेवण्यासाठीं आपल्या एका मित्राच्या गोडाऊनमध्यें सोय केली. पुढें कोळशाची पोतीं व मागे साखरेची अशा थाट! कोळशाच्या खाणी! हिरा सांपडूं शकतो तर हिरकणीसारखी शुभ्र दाणेदार साखर कोळश्याच्या गुदामांत कां राहूं शकणार नाहीं? नंतर कांहीं महिन्यांनीं पुनः साखरेवर नियंत्रण आलें–वाटप झालें आणि मग कोळशाच्या गोडाऊनमध्यें काळाबाजार सुरू झाला.

### ठकास महाठक!

साकळचंद शेटजींना एकदम शंभर पोत्यांची ऑर्डर मिळाली. भाव ठरला. माल गिऱ्हाइकानें रातोरात उठवला. पैसे दुसऱ्या दिवशीं संध्याकाळीं मिळणार होते. शेटजी मात्र महाधूर्त. पोलिसांना चुकविण्यासाठीं स्वतः पैसे घेण्यासाठीं न जातां संकेतस्थानी आपल्या विश्वासांतील रामसिंग भय्याला पाठविलें व शेटजी बंगल्यावर त्याची वाट पहात बसले. भय्या परतला.

'क्यौं रामसिंग काम फत्ते!' शेटजींनीं अगदीं राघोबा दादाच्या थाटांत विचारलें.

'हां शेठ बिलकुल!' असें म्हणत रामसिंगनें आपल्या मलमली पैरणीच्या खिशांतून नोटा काढून शेटजीजवळ अदबीनें दिल्या व विजयाच्या दृष्टीनें तो आपल्या धन्याकडे पाहूं लागला. नोटा पाहतांच काळ्या बाजारवाल्या शेटजीचा चेहरा त्याच्या धंद्याला संपूर्ण शोभेसा झाला. कारण त्या सर्व खोट्या नोटा हजाराच्या होत्या. नोटा हजाराच्या पण किंमत शून्य!

नंतर शेटजींनीं खूप धांवपळ केली पण साखर गेली व पैसाही गेला. तेल गेलं, तूपहि गेलं आणि हाती हातकड्यांचें धुपाटणं आलं!

कारण तिसऱ्या दिवशीं शेटजींना पोलिसांनीं पकडून कोर्टांत उभें केलें. शेजारींच पिंजऱ्यांत, त्यांची साखरेच्या गिऱ्हाइकांशीं गांठ पडली. म्हणजे त्याचं असं झालं कीं माहीमच्या खाडींतून एका जहाजामधून साखरेची पोती पळवतांना त्या गिऱ्हाइकांस पोलिसांनीं पकडलें आणि नंतर चौकशींत साकळंद शेटजींनीं ती पोतीं त्याला विकल्याचें निष्पन्न झाल्यामुळें पोलिसांनी शेटजींना काळ्याबाजारांत साखर विकण्याच्या गुन्ह्याखालीं अटक केली. अशा रितीनें शेटजींना गिऱ्हाइक सांपडलें–पण कशा परिस्थितींत! साकळचंद शेटजींचा कांहीं प्रसंग मोठासा नाट्यपूर्ण वाटला नाहीं.

### पहा, डोके कसें चालतें

साखर, अन्नधान्य वगैरे आवश्यक वस्तूंचाच काळाबाजार चालतो असें नाहीं तर मोटारी, दारू वगैरे चैनीच्या गोष्टींचाही काळाबाजार होतो. संपूर्ण दारूबंदी होण्यापूर्वी उपनगरांतून मुंबई शहराकडे हातभट्टीची गांवठीं दारू चोरून जात असे, या चोरट्या रहदारीच्या पुष्कळ भानगडी असत व त्या करतां नानाविध युक्त्या योजल्या जात. नेहमीचा प्रकार म्हणजे सायकल ट्यूबमध्यें दारू भरून त्या रबरी नळ्या कमरेभोवतीं. गुंडाळायच्या. किंवा खालपासून वरपर्यंत पायाला बांधावयाच्या. वर ऐसपैस लेंगा! या कार्याकरतां साधारणतः भटके, भुकेकंगाल बेकार लोक पूर्वी मिळत. काम फत्ते झाल्यास त्यांना दोन तीन रुपये दिलें जात. पण वाटेंत पोलिसांनीं पकडलें कीं कमीत कमी तीन महिने तुरुंगवास! अगदीं 'जितो वा प्राप्यसी' अशी स्थिती. कोर्टांत उभे केलेले हे दारूचोर लोक हिटलरच्या आत्मयज्ञी पथकांतील स्वयंसेवकाप्रमाणें निग्रही चेहेरे करून उभे रहात. त्यांतील बहुतेक गुन्हा कबूल करीत व दोन रुपयांच्या लोभानें असें केलें म्हणून सांगत. संपूर्ण दारूबंदीनंतर यांची संख्या खूपच घटली आहे.

### तंबोऱ्यांतील मादक संगीत

ह्या दारूचोर म्हणजे चोरून दारू नेणाऱ्या लोकांनीं बहुविध हिकमती लढविल्या. पण पोलिसांनीं शिताफीनें त्या उघडकीस आणल्या. एकदां एक भिकारी चालला होता रेल्वेतून. त्याच्या हातांत तंबोरा होता–पण त्याला तारा नसल्यानें संशय येऊन त्यानें भिकाऱ्यास हटकलें, तंबोरा तपासतांच त्याच्या भोपळ्याच्या तोंडाशीं कापडाचा बोळा बसविलेला आढळला. तो काढून पाहतां भोपळ्याच्या पोटांत दारू भरलेल्या सायकलच्या नळ्या दिसून आल्या. त्या तंबोऱ्यास तारा असत्या तर खरोखरच त्यांतून मादक संगीत पाझरलें असतें!

दुसऱ्या प्रसंगीं एक इसम गाडींतून भलें मोठें कलिंगड घेऊन चाललेला एका पोलिसाला दिसला. कलिंगड मांडीवर घेऊन बसला होता तो इसम. तें खालीं ठेवण्यास तो नाखूष दिसला. इतरांनीं खूप सांगितलें पण व्यर्थ. त्या कलिंगडावरची चौकोनी चकती बरीच मोठी दिसत होती. पोलिसास संशय येऊन त्यानें कलिंगड तपासून पाहिलें. तों तें आंतून व्यवस्थित पोखरलेलें दिसलें. आणि त्या पोकळींत दारूनें भरलेला रबरी फुगा दिसून आला. यापेक्षांही जादा डोकें या कामीं वापरलेलें आढळून आलें.

### गणेशाच्या उदरांतील मादक द्रव्य!

गणपती उत्सव जवळ आला होता. उपनगरांतील एकानें गणपतीचा कारखाना काढला व तयार होतील तशातशा श्रीगणेशाच्या मूर्ति तो विकण्यासाठीं हमालाच्या डोक्यावरून मुंबईस पाठवूं लागला. या पवित्र कार्याबद्दल कोणासही संशय आला नाहीं. गणेशचतुर्थीच्या आदल्या दिवशीं एकच मोठा गणपती तीनचारवेळां पोलीस नाक्यावरून रस्त्यानें नेतांना पोलिसानें पाहिला. ड्यूटीवरील पोलिसांनीं गणपती वाहकास प्रश्न केला असतां तो गोंधळला–चाचरला. शेवटी गणरायांना पोलिसानें खालीं उतरून घेतलें तों ती मूर्ति त्याला विशेष जड वाटली. अधिक कसून तपास करतांच गणपतीच्या पोटांतील पाप बाहेर आलें. कारण त्या मूर्तीच्या आंतील पोकळ भागांत दारू भरलेल्या सायकल ट्यूब्स् व्यवस्थित ठेवलेल्या सांपडल्या.

### शार्विलकांचा मार्ग

या मार्गाहून भिन्न असें दुसऱ्याचें वित्त लुबाडण्याचें गुन्हेगारांचे मार्ग आढळतात. त्यांतील शार्विलकांचा मार्ग म्हणजे दुसऱ्याच्या घरीं चोरी करणें, दरोडा घालणें, हा होय. असें करतांना अगदीं बेमालूम काम केलें असतांही गुन्हे उघडकीस येतात. त्यांत पोलिसच्या चातुर्याबरोबर गुन्हा करणाऱ्याच्या मूर्खपणाचाही वाटा असतो.

वीसपुरांतील शंकररावांच्या बंगल्यांत पाहुणे आले होते. पाहुणे दुसऱ्या दिवशीं पहाटेच्या गाडीनें परत जाणार होते. आदल्या रात्रीं यजमानांनीं पाहुण्यास बजावलें कीं, 'जातांना आम्हांस तुम्ही उठवा म्हणजे आम्ही तुम्हांला निरोप देऊं.'

पाहुणे 'अहो, कशाला त्रास घेतां अपरात्रीं उठण्याचा. तुम्ही आपले झोपा. मी माझी वेळ झाली कीं बॅग घेऊन चालावयास लागेन. जातांना मी बाहेरून दार ओढून घेईन म्हणजे झाले.'

इतकें बोलणें झाल्यावर सर्व मंडळी झोपण्यास गेली.

सकाळ झाली. शंकरराव उठले. बघतात तो बाहेरचा दरवाजा









सताड उघडा. चोरी झाल्याच्या खुणा. दाराशीं टाईमपीस घड्याळ पडलेले. पाहुणे केव्हांच निघून गेले होते–तशा स्थितींत क्षणभर कां होईना शंकररावांना पाहुण्याचा संशय आला. पण तो त्यांनीं तितक्याच वेळांत झाडून टाकला. झालें पोलिसांकडे वर्दी दिली गेली. पोलिसांनीं शंकररावांचे बंगल्याचा म्हणजे–गुन्ह्याच्या जागेचा–रीतसर पंचनामा केला व अस्ताव्यस्त पडलेल्या वस्तु टाइमपिससकट जप्त केल्या.

### तो चोरी कशी करील

फौजदारांनीं शंकररावास विचारलें, 'तुम्हांला कोणाचा खास संशय आहे कां या प्रकरणांत !' शंकरराव म्हणाले, 'कोणाचाच नाहीं.' आमचे पाहुणे बहुतेक घाईंत दार उघडें टाकून गेलें असावेत व दार उघडें पाहून कोणीतरी रस्त्यावरच्या चोरट्यानें घरांत शिरून हा प्रकार केला असावा.

पण पोलिसांचें समाधान झालें नाहीं. त्यांनीं नेहमीच्या पद्धती-प्रमाणें तपासाचें कामीं शंकररावांचा नोकर केरू यांस संशयावरून अटक केली. तेव्हां शंकररावास फार वाईट वाटलें. केरू हा जुना नोकर. तो असें कसें करील ! शेवटीं पोलिसांचा तपास पुरा झाला व त्यांनीं केरूवरच आरोपपत्र ठेऊन कोर्टांत खटला भरला.

हें कसें झालें याचें शंकररावांना आश्चर्य वाटलें. तेव्हां फौज-दारांनीं त्यांस सर्व प्रकार समजाऊन सांगितला.

'हें पहा शंकरराव,' फौजदार म्हणाले–'चोरी–नंतर तुमच्या दाराशीं पडलेलें टाईमपीस घड्याळ आम्ही जप्त केल्याचें तुम्हांस आठवत असेलच. तें घड्याळ आम्ही पुण्याच्या फिंगर प्रिंट ब्युरोकडे पाठविलें होतें. त्याचबरोबर संशयित केरू याच्या आंगठ्याचे व बोटांचे ठसे घेऊन तें पण ब्यूरोकडे पाठविले होते; तेथें घड्याळांवर उठलेल्या आंगठ्याच्या व बोटांच्या ठशांचे फोटो घेण्यांत आले व त्या फोटोंतील ठसे आम्ही पाठविलेल्या केरूच्या ठशांशीं ताडून पाहण्यांत आले. त्यामुळें असें सिद्ध झालें कीं घड्याळावरील बोटें केरूचीच होत.

अहो पण केरू आमचा गडी. तो केव्हांतरी घड्याळाला हात लावतोच. शंकरराव फौजदारांना अडवीत म्हणाले.

गुन्ह्याला वाचा फुटावयाची.

'जरा सबूर' फौजदार सांगूं लागले. 'ह्या ठशामुळें आमचा संशय बळावला व अधिक तपास करतां तुमचा चोरीचा माल केरूनें हजर केला आमच्यापुढें. शिवाय केरूनें कबूल केलें कीं पाहुणे दारास कडी न लावता स्टेशनवर जाणार होतें हें त्यानें त्या रात्रीं ऐकले होतें. या गोष्टीचा फायदा घेऊन चोरी करण्याचा मोह त्याला पडला कारण त्याच्या कल्पनेप्रमाणें चोरीचा आळ प्रथम रस्त्यावरच्या अज्ञात चोरावरच आला.

हें ऐकल्यावर मात्र शंकररावांना पटलें कीं, गुन्ह्याला वाचा ही फुटावयाचीच.

### हपापाचा माल गपापा

दुसऱ्याच्या खिशांतील पैसे आपल्या खिशांत आणण्याचे कांहीं मार्ग आतांपर्यंत वर्णन केले. पण हे सर्व बेकायदेशीर मार्ग होते. आतां कांहीं लोक कायदेशीर मार्गांनीं म्हणजे कोर्टाच्या मार्फत कसे पैसे काढतात त्याचे एक मनोरंजक उदाहरण पाहण्यासारखें आहे. ही हकीकत भारतांतील नसून इंग्लंडांतील आहे.

एडमंड नांवाच्या एका गृहस्थानें 'रे हॉटेल' या एका प्रसिद्ध हॉटेलांतील दोन खोल्यांत आपला मुक्काम ठोकला. तेथें तो उमरावा-सारखा राहूं लागला. आजूबाजूच्या श्रीमंत लोकांना वारंवार पार्ट्या देणें, जवाहिरे लोकांकडून उंची रत्नें विकत घेणें, वगैरे कार्यक्रम त्यानें सुरू ठेवला. शेवटीं एक दिवस जवाहिऱ्यांची, कापडवाल्यांची वगैरे बिलें त्यानें पूर्ण चुकती केली. हॉटेलवाल्याखेरीज कोणाचेंही देणें ठेवलें नाहीं. सगळ्यांचा निरोप घेतला व पहिल्या वर्गाचें तिकीट काढून तो आगगाडींत जाऊन बसला.

### अगदीं मनासारखें झाले

हॉटेलच्या मॅनेजरला एडमंड हॉटेल सोडून गांवाला जाणार आहे व स्टेशनवर गेला आहे असें कळलें तेव्हां लागलीच तो स्टेशनवर गेला. एडमंडकडे त्यानें बिल मागितलें तेव्हां तो म्हणाला, मजजवळचे पैसे संपले आहेत. गांवी गेल्यावर चेक पाठवितो. मॅनेजर ऐकेना. गाडी सुटण्याची वेळ झालेली. शेवटी मॅनेजरनें हमालाकरवीं एड-मंडचें सर्व सामान प्लॅटफार्मवर उतरून टाकलें व त्याला पण डब्याच्या बाहेर खेचलें. गाडी निघून गेली. एडमंडच्या मात्र सर्व कांहीं मनासारखें झालें.

दुसऱ्या दिवशीं एडमंडनें सॉलिसिटर कडून हॉटेल मॅनेजरला आपली अब्रुनुकसानी केल्याबद्दल पन्नास हजार पौंड नुकसान भरपाई देण्यास आव्हान दिलें. मॅनेजरनें उलट उत्तरीं त्याची मागणी धुडका-वून लावली आणि तें प्रकरण कोर्टांत गेलें.

### ते सभ्य गृहस्थ आहेत

एडमंडनें रे हॉटेलच्या मॅनेजरवर पन्नास हजार पौंड नुकसानभरर-पाई देण्याकरतां दावा लावला. आपल्यातर्फे एडमंडनें ज्यांना ज्यांना राजेशाही पार्ट्या दिल्या होत्या त्यांतील प्रमुख लोक साक्षीदार म्हणून पुढें आणलें. त्यानें सांगितलें कीं एडमंड हा मोठा सभ्य श्रीमंत 'जंटल-मेन' आहे म्हणून. त्याचप्रमाणें जवाहिरे, कापड दुकानदार वगैरे लोकांनीं आपल्या साक्षींत सांगितलें कीं एडमंडनें आमच्याकडून खूप उंची माल विकत घेतला व सर्व बिलें चुकती केलीं आहेत.

या उलट हॉटेलतर्फे एडमंडनें आपलें बिल दिलें नाहीं म्हणून पुरावा आणण्यांत आला.

शेवटीं आर्ग्युमेंट करतांना एडमंडच्या बॅरीस्टरनें कोर्टांत सांगि-तलें कीं इतर श्रीमंत लोक, दुकानदार यांच्या साक्षीवरून त्याच्या अशी-लाचा मोठा सामाजिक दर्जा प्रथापित झाला आहे. आणि अशा सभ्य इसमाचें पहिल्या वर्गाच्या डब्यांतून, रेल्वे स्टेशनसारख्या सार्वजनिक जागीं, सामान बाहेर काढून व त्यास डब्यांतून खेचून काढून प्रति-वादीनें त्याची अब्रुनुकसानी केली आहे. तेव्हां कोर्टानें, मागणी केल्याप्रमाणें डिक्री पास करावी.

आणि या खटल्याचा निकाल संपूर्णतया एडमंडच्या बाजूनें झाला व त्यास पन्नास हजार पौंड अब्रुनुकसानभरपाई मिळाली. हें सगळें एडमंडनें रचलेलें कारस्थान होतें. आणि हें करण्यास त्याला जेमतेम दहा हजार पौंड खर्च आला.

कसा सनदशीर मार्ग हा ! फसवेगिरीचे अनंत मार्ग आहेत. फ्रॉड इज इन्फिनिट हेंच खरें ?

असो गुन्हेगारांचे असे अनंत प्रकार आहेत. संपत्तीच्या लोभानें केलेले कांहीं गुन्हे आतांपर्यंत सांगितलें. आतां स्त्रियांच्यामुळें कित्येक गुन्हे होतात त्याचे वर्णन पुढें केव्हां तरी करूं.

●●●




## गोमन्तक – एक यक्षप्रश्न

—सारस्वत

ज्याला शेंडा ना बुडखा अशा गोमंतकाच्या अंतर्गत राजकारणाकडे उभ्या महाराष्ट्राची नजर लागलेली आहे. येत्या डिसेंबरमध्यें गोव्यांतील पहिलीच निवडणूक होणार आहे. आणि या निवडणुकींत कोणता पक्ष सत्तारूढ होतो या भवितव्याबद्दल सर्वत्र चर्चा चालू आहे. अर्थातच या गोष्टीची महाराष्ट्राला विशेष आत्मियता आहे. याचें कारणहि उघड आहे. उभ्या भारतांतील कोणत्याहि प्रांतापेक्षां–गेल्या दहा वर्षांत–मराठी मुलुखानें गोव्यासाठीं जेवढें केलें, तेवढें अन्य कुणीहि करूं शकला नाहीं. गोमंतक स्वातंत्र्य संग्रामांत ज्या ज्या गोमंतकीयांनी उडी घेतली ते ते सर्व आश्रयासाठीं महाराष्ट्रांतच धांवून आले. कारण इतर कोणत्याहि जवळच्या प्रांतापेक्षां महाराष्ट्राची मांडी ही त्यांना पित्याची मांडी होती. अर्थातच त्याच अंकावर तीं लेकरें अधिकारानें येऊन बसलीं, परंतु स्वातंत्र्यानंतर मात्र त्यांतील बऱ्याचशा सुपुत्रांचा बुद्धिभ्रंश झाला. ते कुपुत्र या पदवीला पात्र झालेले आहेत. स्वार्थपरायण वृत्ति त्यांच्या रोमारोमांत भिनलेली आहे. आणि तिच्या पूर्ततेला लागणाऱ्या सर्व वाममार्गांचा अवलंब केल्यामुळें आजच्या अनेक पक्ष–उपपक्षांचा सांवळा गोंधळ तिथें चालू झालेला आहे.

### सगळेच संधीसाधू

स्वातंत्र्य लढ्यांतले अगदीं मोजकेच निष्ठावंत सेनानी सोडले तर बाकीचे सारे तापलेल्या तव्यावर पोळी भाजून घेणारे होते. गोमंतक स्वतंत्र होतांच हे सगळे संधीसाधू तिथें धांवले आणि सर्व क्षेत्रांत त्यांनी बेदिली माजवून ठेवली. त्यांतून पूर्वीच्या राजवटीशीं एकनिष्ठ राहिलेले प्रसंगी भारतसरकारच्या कारवाईला तन–मन–धनानें विरोध करणारे भूमिपति, धनपति एका एकीं टोप्या फिरवून देशभक्तीचा डांगोरा पिटून आपणच त्यागी विरागी असल्याचीं सोंगें आणून नाचूं लागलेले आहेत. गोमंतक भारतात विलीन झाल्यानंतर या पुर्तुगेज धार्जिण्या लोकांचीं नाकें ठेंचलीं जातील या भावनेनें आनंदांत असलेली सामान्य जनता खुद्द सरकारनेंच या उलट्या काळजाच्या लोकांशीं हात मिळवणी केल्यानें गोंधळून गेली. या परिस्थितीचा फायदा अनेक उपऱ्या पक्षाना मिळाला. शिवाय स्वातंत्र्योत्तर गोमंतकांत भारतसरकारतर्फें नेमल्या गेलेल्या शासनसंस्थेनें तिथें जो उलटासुलटा हात फिरवला–लांचलुचपतीनें जें विदारक स्वरूप दाखविलें, तिनें सामान्य जनतेचें काळीज अधिकच विदीर्ण झालें. आगीतून उठून फुपाट्यांत पडल्यासारखी अवस्था झाली. ' पूर्वीची राजवट बरी होती ' असे उद्‌गार प्रत्येकाच्या तोंडून निघूं लागले; पण सरकारनें त्याची दखल तर घेतलीच नाहीं; उलट गोमंतकांच्या बाबतींत सव्य अपसव्य विधानें करून संधिसाधूंचे मार्ग अधिक निष्कंटक करून ठेवले.

### आमचा नेता कोण ?

निवडणुकीच्या या रणांत परस्पर विरोधी अशा भूमिकांचे जे अनेक पक्ष आहेत त्यांत तिघांची हालचाल विशेष–एक महाराष्ट्रवादी गोमंतकीय; दुसरे मध्यवर्ती सरकारच्या नियंत्रणाखालीं राहूं इच्छिणारे; व तिसरे महाभयंकर 'युनायटेड गोअन्स'--परंतु या तिन्हीं गटांतील एकहि पुढाऱ्याबद्दल खुद्द गोव्यांतील सामान्य वा मध्यमवर्गीय जनतेत विश्वास नाहीं हें त्रिवार सत्य आहे. मध्यंतरीं ज्या महाराष्ट्रवादी निष्ठावंत वाटणाऱ्या पुढाऱ्यांनी तत्वाचा प्रश्न येतांच आपल्या पक्षाचे राजिनामे दिले व स्वतःची, स्वतःच्या महाराष्ट्र निष्ठेची अफाट जाहिरात करून घेतली त्यांचें तें कृत्य म्हणजे एक फार्सच ठरला. त्यांतून श्री. के. के. शहा व श्री. लालबहादुर शास्त्री यांनी जीं मुक्ताफळें उधळलीं त्यानें तर महाराष्ट्र विरोधकांची व ' युनायटेड गोअन्स ' मधील छुप्या पुर्तुगेज हस्तकांचें अधिकच फावलेलें आहे. या सर्व गुंतागुंतीच्या हाणामारीमुळें ' आमचें आतां पुढें काय होणार ! ' असा यक्ष प्रश्न मतदान करणाऱ्या सर्व सामान्य नागरिकांसमोर उभा राहिला असल्यास नवल नाहीं. आपलें कल्याणकर्ता पुढारी कोण हाच प्रश्न गोमंतकीय जनतेला सारखा सतावित आहे, त्यांची अवस्था त्रिशंकूसारखी झालेली आहे हें तिथें फेरफटका मारून आलेला कुणीहि सूज्ञ माणूस सांगूं शकेल !

---

## महाराष्ट्राचे मुख्यमंत्री श्री. कन्नमवार यांचे शोचनीय निधन



हा नोव्हेंबर महिना म्हणजे शोकांतिकेचा जबर धक्का देणारा एक महाभयंकर काळ होता असाच ह्याचा उल्लेख करावा लागेल. अमेरिकेचे अध्यक्ष प्रे. जॉन केनेडी यांच्यावर गोळ्या घालून ठार केल्याच्या वार्तेने, तसेंच पांच भारतीय सेनाधिकाऱ्यांच्या अपघाती निधनाच्या वार्तेनें झालेला शोक पुरता आवरता आलेला नाहीं, तोंच, महाराष्ट्र राज्याचे लोकप्रिय मुख्यमंत्री श्री. मां. सां उर्फ दादासाहेब कन्नमवार याच्या शोचनीय निधनाच्या वार्तेनें अख्या महाराष्ट्रालाच नव्हे तर समस्त



अनुक्रमणिका

भारताला शोकविव्हळ केलें. एकंदरींत जगाच्या राजकारणांत उलथा पालथ करण्याचेंच निष्ठूर काळानें ठरविलें आहे कीं काय ! अशी शंका मनाचा थरकांप उडवून देते.

ना. कन्नमवारांचें हें अकाली निधन होण्याच्या पांच दिवस आधींच त्यांच्या मुख्य-मंत्री पदाला एक वर्ष पूर्ण झालें होतें. मुख्यमंत्री पदाचें त्यांचें हें दुसरें वर्ष सुरू होतें न होतें तोंच नियतीच्या जबर हाताने त्यांच्या-वर अशी अकालीं झडप घातली.

श्री. कन्नमवार यांची रहाणी साधी भोळी होती. राजकारणांत शिरूनहि केवळ सहिष्णु-तेच्या भावनेमुळेंच ते कधीं कुणाशी डावपेंच खेळूं शकले नाहीत. त्यांच्या या साध्या–भोळ्या राहणींत व मनमिळाऊ स्वभावांतच त्यांच्या मनाचा मोठेपणा दिसून येतो. राजकीय क्षेत्रांतील त्यांच्या मौलिक कामगिरीचा तर महाराष्ट्राला विसर पडणें शक्यच नाही. त्यांच्या या निधना-मुळें मराठी जनता एका गोड स्वभावाच्या नेत्याला मुकली आहे. त्यांच्या कुटुंबियांवर अचानक ओढावलेल्या दुःखाच्या आपत्तित ' दीपावली ' सुद्धां सहभागी आहे.

---

# एक सुव्यवहारी मुमुक्षु गेला

गेल्या पिढींतील एक निष्ठावंत साहित्यिक व ' प्रसाद ' या प्रतिष्ठित मासिकाचे एक संपा-दक श्री. यशवंत गोपाळ जोशी यांचें गेल्या महिन्यांत एकाएकीं देहावसान झालें. जोशी-बुवांनी नाटय, चित्रपट कथा, कादंबरी, धर्म व पुराण या विषयांवर विपुल लेखन करून मराठी साहित्यांत अत्यंत मोलाची भर घात-लेली आहे. जिव्हाळ्याच्या कौटुंबिक विषयांना हात घालून अतिशय सोज्वळपणें मांडणारे त्यांच्यासारखे लोकप्रिय लेखक आतां फार थोडे राहिलेले आहेत. मागच्या पिढीचें सुव्यवहारी चोख मुमुक्षु जीवन जोशीबुवा आमरण जगले. हिंदु संस्कृतीची ती चालती बोलती मूर्तीच होती. वैश्वदेव, पूजा--अर्चा, सर्व आन्हिकें इत्यादि वडिलांनी आचरीलेल्या धर्माचा ते नेम चालवित असत. जीवनभर ते एका विलक्षण निष्ठेनें वागले; व त्याच निष्ठेनें त्यांनी लिहिलेंहि. साहित्यावर व्यवस्थित योगक्षेम चालविणाऱ्यां पैकीं जोशीबुवा हे एक होते; पण त्यांचा अभिमान एवढा दांडगा, कीं बदलत्या परिस्थितीला हात जोडून ते शरण गेले नाहींत.

लैंगिक लिहिल्यानें अर्थसाधना होते,' म्हणून आपल्या इतर समवयस्कांप्रमाणें त्यांनी हवी तशी टोपी फिरविली नाहीं. किंवा आपल्या प्रकाशन संस्थेतर्फे तसलें कांहीं प्रकाशित केलें नाहीं. भारतीय संस्कृतीशीं इमान राखून मराठी साहित्यांत दिग्विजयी टिकाव धरणारा एक थोर साहित्यिक व प्रकाशक म्हणून त्यांचें स्थान सदा अढळ राहील. दीपावलीचे एक थोर हितचिंतक कै. स. आ. जोगळेकर यांचे व त्यांचे बंधुतुल्य स्नेह होते. जोगळेकरांशीं होत असलेल्या संभाषणांत त्यांच्याबद्दल आदरभाव असे. त्यांच्या कुटुंबियांच्या दुःखांत आम्ही सहभागी आहोंत.



प्रसाद मासिकाचे संपादक कै. य. गो. जोशी

●●●

## साभार पोच–

**कळसाची चमक**

लेखक–स. कृ. जोशी, प्रकाशन–वोरा अॅन्ड कंपनी, किं. रु. २–००.

**नगाधिराज हिमालय**

लेखक–डॉ. के. ना. वाटवे, प्रकाशक–वोरा अॅन्ड कंपनी, किं. रु. १–२५ न. पै.

**शुभ मंगल झालें**

लेखक–वा. ल. वझे, प्रकाशक–गोकुळ मासिक प्रकाशन, किं. २–५० न. पै.

**बांसरी**

लेखक–अनंत कदम, प्रकाशक–परब ब्रदर्स, मुंबई–४, किं. रु. २–००

**औट घटकेचा सन्यास**

लेखक–प्रकाशक–भा. वि. नाडकर्णी, गवा-लिया टॅंक रोड, मुंबई–२६ किं. रु. २–००

**हरिणीची हांक**

लेखक– प्रभाकर रुईकर, – प्रकाशक–प्रभाकर ग्रंथ प्रकाशन, कराड, किं. रु. २- ००

●●●

अनुक्रमणिका

दीपावली बुद्धिवळ क्र. २



"दीपावली बुद्धिवळाचे" नियम व अटी मला मान्य आहेत.

स्पर्धकाचें नांव ______

पूर्ण पत्ता : ______

## दीपावली बुद्धिवळ क्र. २

येथें कापा

**आडवे शब्द—**

१ रागाचें फाजील भाषण
५ अनेक
६ सरकारी देणें
८ दया
१० धक्का
१२ मुसलमानांचें पवित्र स्थान
१३ उणीव
१५ टिकाव
१९ दैवी राग
२० अनेक जातींचीं फळें

**उभे शब्द—**

२ पांघरूण
३ शिवनृत्य
४ डौल-ऐट
५ दृष्यकाव्य
७ समुद्र
८ शिस्तीनें वागण्याचें शिक्षण
९ गुरू
१० लाकडी तलवार
११ कणखर
१४ शंकर
१६ बेपत्ता
१७ आफ्रिकेंतील एक प्राणी
१८ गळ्यांत घालण्याचा एक अलंकार

**उत्तरें पाठवावयाची शेवटची तारीख**
**१५ डिसेंबर १९६३**
**अधिकृत उत्तर-पुढील अंकांत**

## स्पर्धकांकरितां नियम व अटी—

१. ही स्पर्धा निःशुल्क आहे.
२. ह्या स्पर्धेत कोणालाहि भाग घेता येईल.
३. स्पर्धेकरितां पाठविण्यांत येणारीं उत्तरें ह्याच पानावर छापलेल्या **चौकोनी कुपनांत** भरलेलीं असावीत. कूपनावर नांव व पत्ता लिहिणें आवश्यक आहे. **अन्यथा तीं विचारांत घेतलीं जाणार नाहींत.**
४. उत्तरें '**दीपावली बुद्धिवळ,**' संपादक, '**दीपावली**', दलाल आर्ट स्टुडिओ, ४२ केनेडी ब्रीज, मुंबई-४ या पत्त्यावर पाठवावीत.
५. ह्या स्पर्धेकरितां आलेल्या अचूक उत्तरांतून ती **लॉट पद्धतीनें काढून** ज्यांचें उत्तर आमच्या उत्तराशीं बिनचूक असेल, अशा **पहिल्या पांच भाग्यवान विजेत्यांना** दीपावलीचे **वार्षिक वर्गणीदार** करण्यांत येईल व त्यांना वर्षभर दीपावली भेट म्हणून पाठविण्यांत येईल.
६. एकावेळीं एकाच स्पर्धकास फक्त एकच चौकोन पाठविता येईल.
७. स्पर्धेबाबत संपादकांचा निर्णय अखेरचा मानला जाईल. त्याबाबत कसलाहि **पत्रव्यवहार केला जाणार नाहीं.**
८. उत्तरें पाठवावयाची अंतिम तारीख १५ डिसेंबर १९६३ ही आहे. नंतर येणाऱ्या उत्तरांचा विचार होणार नाहीं. उत्तर पुढील अंकांत प्रसिद्ध केलें जाईल.








अनुक्रमणिका

